# नवभारत

वर्ष ५ वें ]   डिसेंबर १९५१   [ अंक ३ रा



**किंमत १ रुपया**

अनुक्रमणिका

















नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्स्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

आ म चें न वें प्र का श न

# आपल्या गणराज्याची घडण

लेखकः– आचार्य दादा धर्माधिकारी

•

आपल्या गणराज्याची घडण होत असतां घडलेल्या अनेक प्रसंगांचीं हृदयंगम वर्णनें आणि त्यांतील थोर मंडळींची उत्कृष्ट शब्द-स्वभाव-चित्रें या पुस्तकांत पत्ररूपानें आपणांस वाचावयास मिळतील. आपल्या खाजगी अथवा सार्वजनिक ग्रंथालयासाठीं आपली प्रत आजच मागवा.

मूल्य ३॥ रुपये : टपाल खर्च निराळा

•

सु ल भ रा ष्ट्री य ग्रं थ मा ला, पु णें २

वर्ष पांचवें
अंक ३ रा

# नवभारत

डिसेंबर
१९५१





## जाहिरातींचे दर

| | सबंध पान | अर्धे पान | पाव पान |
|---|---|---|---|
| एक वेळ | ७५ | ५० | ३५ |
| तीन वेळा | ७० प्रत्येक खेपेस | ४५ प्रत्येक खेपेस | ३० प्रत्येक खेपेस |
| सहा वेळां | ६५ ,, | ४० ,, | २५ ,, |
| बारा वेळां | ६० ,, | ३५ ,, | २० ,, |

पाव पानापेक्षां कमी जाहिरात स्वीकारली जात नाहीं.

| | | |
|---|---|---|
| कव्हर पान नं. ४ | प्रत्येक वेळेस | ५० रुपये |
| कव्हर पान नं. २ व ३ | ,, ,, | २० रुपये |

(१) सर्व जाहिराती ' जाहिराती व जाहिरातदार ' या सदरांत छापल्या जातात.
(२) शक्य असेल त्या वेळेस ज़ाहिरातदारांचा थोडक्यांत परिचय देण्याची पद्धत स्वीकारलेली आहे.
(३) एका पानांत दोन कॉलम्स असतात.
(४) पानाचा आकार ८॥" × ५।"

व्यवस्थापक
' नवभारत '
२९१ शनिवार, पुणें २

विक्रीस तयार !

# नवभारत

'नवभारता'च्या दुसऱ्या वर्षाच्या (ऑक्टोबर १९४८ ते सप्टेंबर १९४९) बारा अंकांचें उत्कृष्ट अर्धकापडी बांधीव पुस्तक विक्रीस तयार असून म. ऑ. नें रु. पंधरा फक्त आल्यास तें रजि. बुक-पोस्टानें घरपोंच पाठवूं. व्ही. पी. नें पाठविलें जाणार नाहीं.

व्यवस्थापक, 'नवभारत'

२९१ शनिवार, पुणें २

## वर्गणीदारांस सूचना

(१) 'नवभारत'चा अंक दरमहा १ तारखेच्या आंत नियमितपणें काळजीपूर्वक पोस्टांत टाकला जातो. वर्गणीदारांस जर आपला अंक ५ तारखेपर्यंत मिळाला नाहीं तर त्यांनीं प्रथम स्थानिक पोस्ट ऑफिसांत चौकशी करून नंतर आमचेकडे लिहावें. अंक शिल्लक असला तरच पाठविला जाईल. अंक न मिळाल्याबद्दल १० तारखेनंतर येणाऱ्या तक्रारीस उत्तर दिलें जाणार नाहीं.

(२) वर्गणीदार कोणत्याहि महिन्यापासून होतां येतें.

(३) पत्रव्यवहार करतांना नेहमीं अनुक्रम-नंबर अवश्य लिहावा. 'नवभारत' कचेरींतून दरमहा जो अंक रवाना होतो त्यावर पत्त्याच्या वरच्या बाजूस डाव्या हाताला अनुक्रम-नंबर लिहिलेला असतो.

(४) पत्ता बदलावयाचा असल्यास त्याबद्दलची सूचना कचेरीस २५ तारखेपूर्वी मिळाली पाहिजे. त्यानंतर सूचना-पत्र आल्यास त्याची अंमलबजावणी त्याच महिन्यांत न होतां पुढील महिन्यापासून केली जाईल.

(५) 'नवभारत'च्या कोणत्याहि एजंटास वर्गणी वसूल करण्याचा अधिकार नाहीं. त्यामुळें कचेरी व वर्गणीदार या दोघांनाहि त्रास होतो व विलंब लागतो. म्हणून वर्गणी नेहमीं कचेरीकडे खालील पत्त्यावर पाठविण्याची कृपा करावी.

व्यवस्थापक

**'नवभारत',**

२९१ शनिवार, पुणें २

सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाचें मासिक

वर्ष पांचवें | डिसेंबर
अंक तिसरा | १९५१

# नवभारत

संचालक : श्री. शंकरराव देव

संपादक-मंडळ

आचार्य शं. द. जावडेकर–आचार्य स. ज. भागवत – श्री. हरि कृष्ण मोहनी – प्रा. वि. म. बेडेकर
का. संपादक



वार्षिक रु. ९ | सहामाही रु. ५ | अंकास रु. १

हें मासिक र. ग. जोशी यांनीं सुलभ मुद्रणालय, २९१ शनिवार, पुणें २, येथें छापून सुलभ राष्ट्रीय ग्रंथमालेच्या विश्वस्तमंडळाकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

# 'नवभारत', डिसेंबर १९५१

## लेखक-परिचय

प्रा. ह. धी. सांकलिया एम्. ए., एलएल्. बी., पीएच्. डी.—पुणें येथील डेक्कन कॉलेज पोस्टग्रॅज्युएट ॲन्ड रिसर्च इन्स्टिट्यूटमध्यें प्राचीन इतिहासाचे प्राध्यापक व इतिहासशाखेचे प्रमुख. 'The University of Nalanda' 'The Archaelogy of Gujerath' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

प्रा. भा. शं. भणगे— मुंबई येथील 'रा. आ. पोद्दार कॉलेज ऑफ कॉमर्स ॲन्ड एकॉनॉमिक्स' या संस्थेंत अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

श्री. गणेश कुडे बी. ए.— अमळनेर येथील हायस्कूलमध्यें शिक्षक.

प्रा. स. वा. कोगेकर— पुणें विद्यापीठांत राज्यशास्त्राचे प्राध्यापक.

डॉ. गो. स. सरदेसाई एल्‌एल्. डी.—यांच्यावरील प्रस्तुत अंकांतील प्रा. शेजवलकर यांचा परिचयलेख पहावा.

प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर— पुणें येथील डेक्कन कॉलेज पोस्टग्रॅज्युएट ॲन्ड रिसर्च इन्स्टिट्यूटमध्यें 'मराठा इतिहासा' चे प्राध्यापक. 'Panipat 1761' या ग्रंथाचे कर्ते.

श्री. ना. ग. जोशी एम्. ए.—(बडोदें)–'जीवनयोग', 'पैगंबराचा बगीचा', 'विश्वमानव' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

श्री. भा. म. काळे एम्. ए., बी. टी.—अर्थशास्त्राचे व्यासंगी. आर्थिक विषयांवर यांचे लेख मराठी नियतकालिकांतून येत असतात. 'युद्धोत्तर आर्थिक पुनर्घटना', 'हिंदचा कापडाचा धंदा' या पुस्तकांचे लेखक.

प्रा. जयंत जोग— औरंगाबाद येथील कॉलेजमध्यें इंग्रजी व मराठी या विषयांचे प्राध्यापक.

प्रा. दे. अ. दाभोलकर— पुणें येथील बृहन्महाराष्ट्र कॉलेज ऑफ कॉमर्स या संस्थेंत अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

श्री. द. बि. गाडगीळ वकील, अकोला (वऱ्हाड)–प्राचीन वाङ्मयाचे व्यासंगी.

# आगामी तत्त्वज्ञानविशेषांक

यापुढील म्हणजे जानेवारी महिन्याचा 'नवभारता' चा अंक 'तत्त्वज्ञानविशेषांक' म्हणून वाचकांना सादर करावयाचें योजिलें आहे.

डिसेंबर महिन्याच्या शेवटच्या आठवड्यांत पुणें येथें पुणें विद्यापीठातर्फे अखिलभारतीय तत्त्वज्ञान-परिषदेचें अधिवेशन होणार आहे. या आधीं पुणें येथें अखिलभारतीय तत्त्वज्ञानपरिषदेचें अधिवेशन १९३४ सालीं भरलें होतें. त्यानंतर आज १७ वर्षांनीं अखिलभारतीय तत्त्वज्ञानपरिषदेच्या अधिवेशनाचा योग महाराष्ट्रांत येत आहे. या अधिवेशनाच्या निमित्तानें साहजिकच उत्पन्न होणाऱ्या वैचारिक वातावरणाचें निमित्त घेऊन, 'नवभारता' नें 'तत्त्वज्ञानविशेषांक' काढावयाचें योजिलें आहे.

तत्त्वज्ञानासारख्या अफाट विषयाचा योग्य असा नुसता ओझरताहि परामर्श एका अंकांत घेणें हें दुष्कर आहे. हें जाणून नियोजित 'तत्त्वज्ञान-विशेषांका' चें क्षेत्र एका विशिष्ट कालखंडापुरतेंच मर्यादित केलें आहे. विशेषतः गेल्या सुमारें पन्नास वर्षांत तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत हिंदुस्थानांत आणि पाश्चात्त्य देशांतून जे विचारप्रवाह उत्पन्न झाले, त्यांपैकीं अत्यंत प्रमुख आणि प्रभावी अशा विचार-प्रवाहांचा आणि त्या विचारप्रवाहाला प्रेरणा देणाऱ्या प्रमुख व्यक्तींच्या प्रमुख विचारांचा संक्षिप्त परिचय आणि समालोचन या विशेषांकांत करून द्यावयाचें योजिलें आहे. या अंकाच्या द्वारें श्रीअरविंद, प्रा. कृष्णचंद्र भट्टाचार्य, प्रा. सर्वपल्ली राधाकृष्णन् इत्यादि भारतीय विचारवंतांचे विचार, पाश्चात्त्य तत्त्वज्ञ व्हाइटहेड, रसेल इत्यादींचे विचार, महाराष्ट्रांतील मार्क्सवादी तत्त्वमीमांसा, पाश्चात्त्य तत्त्वज्ञानक्षेत्रांतील डायलेक्टिकल मटीरिॲलिझम्, प्रग्मॅटिझम्, एक्झिस्टेन्शिॲलिझम्, लॉजिकल पॉझिटिव्हिझम् इत्यादि विचार-संप्रदाय यांचा त्रोटक परिचय तज्ज्ञांनीं करून दिलेला वाचकांस पहावयास मिळेल.

या अंकांतील लेखांबाबत प्रा. शं. वा. दांडेकर, प्रा. दे. द. वाडेकर, प्रा. श्री. गो. हुल्याळकर, प्रा. वा. कृ. कोतुरकर, आचार्य शं. द. जावडेकर, त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी, श्री. दि. के. बेडेकर, प्रा. श्रीनिवास दीक्षित, प्रा. दि. द. माहुलकर, रावसाहेब पटवर्धन, श्री. चंद्रोदय भट्टाचार्य, म्हैसूर विद्यापीठाचे प्रा. नारायणराव निकम, सागर विद्या-पीठाचे प्रा. रासबिहारी दास इत्यादि आपापल्या क्षेत्रांतील अधिकारी लेखकांचें साहाय्य लाभलें आहे. यावरून या विशेषांकाच्या भरगच्च अंतरंगाची कल्पना येऊं शकेल. साहजिकच हा अंक 'नवभारता' च्या नेहमींच्या अंकापेक्षां मोठा म्हणजे शंभर पानांच्या-वर होणार आहे. अशा तऱ्हेनें आपल्या समकालीन प्रमुख प्रेरक विचारांचें तज्ज्ञांनीं करून दिलेलें दर्शन-ओझरतें का होईना-एका अंकाच्या कक्षेंत एकत्र सादर केलेलें वाचकांस औचित्यपूर्ण, उद्बोधक आणि स्वागतार्ह वाटेल असा विश्वास वाटतो.

तत्त्वज्ञानपरिषदेचें उद्घाटन मध्यवर्ती सरकारचे मंत्री ना. न. वि. गाडगीळ यांच्या हस्तें ता. २७ डिसेंबरला होणार आहे. त्याच प्रसंगीं आमच्या विनंतीवरून ना. न. वि. गाडगीळ यांनीं 'नवभारता' च्या तत्त्वज्ञानविशेषांकाचें प्रकाशन जाहीर करण्याचें मान्य केलें आहे. तत्त्वज्ञानपरिषदेच्या अधिवेशनाचे स्थानिक कार्यवाह यांनीं 'नवभारता'-च्या तत्त्वज्ञानविशेषांकाच्या प्रकाशनास आपल्या अधिवेशनाच्या कार्यक्रमांत जागा देण्याचें आणि ना. न. वि. गाडगीळ यांनीं प्रकाशन जाहीर कर-ण्याचें मान्य करून 'नवभारता' च्या तत्त्वज्ञान-सेवेच्या या प्रयत्नास जें प्रोत्साहन दिलें आहे, ह्याबद्दल आम्ही उभयतांचे ऋणी आहोंत.

**— वि. म. बेडेकर**

# 'नवभारत' प्रकाशनमाला

'नवभारत' मासिकाच्या नोव्हेंबर १९५१ च्या अंकांत दीपावलीच्या निमित्तानें श्री. प्रेमा कंटक यांनीं लिन युथांग यांच्या मूळ कादंबरीवरून अनुवादिलेली 'पंकज' नांवाची कादंबरी दिली होती. ती आज स्वतंत्र पुस्तकाच्या रूपानें 'नवभारत' प्रकाशनमालेचें पहिलें पुष्प म्हणून आम्ही आनंदानें प्रकाशित करीत आहोंत.

'नवभारत' मासिकांतून उदित होणाऱ्या 'नवभारत' प्रकाशनमालेचा हा उपक्रम वाचकांस स्वागतार्ह वाटेल अशी अपेक्षा आहे. 'नवभारत' मासिकानें गेल्या चार वर्षांत अनेक विषयांवर उच्च










# 'नवभारत', डिसेंबर १९५१

## लेखक-परिचय

प्रा. ह. धी. सांकलिया एम्. ए., एल्एल्. बी., पीएच्. डी.—पुणें येथील डेक्कन कॉलेज पोस्टग्रॅज्युएट ॲन्ड रिसर्च इन्स्टिट्यूटमध्यें प्राचीन इतिहासाचे प्राध्यापक व इतिहासशाखेचे प्रमुख. 'The University of Nalanda' 'The Archaelogy of Gujerath' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

प्रा. भा. शं. भणगे— मुंबई येथील 'रा. आ. पोद्दार कॉलेज ऑफ कॉमर्स ॲन्ड एकॉनॉमिक्स' या संस्थेंत अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

श्री. गणेश कुडे बी. ए.— अमळनेर येथील हायस्कूलमध्यें शिक्षक.

प्रा. स. वा. कोगेकर— पुणें विद्यापीठांत राज्यशास्त्राचे प्राध्यापक.

डॉ. गो. स. सरदेसाई एल्एल्. डी.—यांच्यावरील प्रस्तुत अंकांतील प्रा. शेजवलकर यांचा परिचयलेख पहावा.

प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर— पुणें येथील डेक्कन कॉलेज पोस्टग्रॅज्युएट ॲन्ड रिसर्च इन्स्टिट्यूटमध्यें 'मराठा इतिहासा'चे प्राध्यापक. 'Panipat 1761' या ग्रंथाचे कर्ते.

श्री. ना. ग. जोशी एम्. ए.—(बडोदें)–'जीवनयोग', 'पैगंबराचा बगीचा', 'विश्वमानव' इत्यादि पुस्तकांचे लेखक.

श्री. भा. म. काळे एम्. ए., बी. टी.—अर्थशास्त्राचे व्यासंगी. आर्थिक विषयांवर यांचे लेख मराठी नियतकालिकांतून येत असतात. 'युद्धोत्तर आर्थिक पुनर्घटना', 'हिंदचा कापडाचा धंदा' या पुस्तकांचे लेखक.

प्रा. जयंत जोग— औरंगाबाद येथील कॉलेजमध्यें इंग्रजी व मराठी या विषयांचे प्राध्यापक.

प्रा. दे. अ. दाभोलकर— पुणें येथील बृहन्महाराष्ट्र कॉलेज ऑफ कॉमर्स या संस्थेंत अर्थशास्त्राचे प्राध्यापक.

श्री. द. वि. गाडगीळ वकील, अकोला (वऱ्हाड)–प्राचीन वाङ्मयाचे व्यासंगी.

---

अनुक्रमणिका

# आगामी तत्त्वज्ञानविशेषांक

यापुढील म्हणजे जानेवारी महिन्याचा 'नवभारता' चा अंक 'तत्त्वज्ञानविशेषांक' म्हणून वाचकांना सादर करावयाचें योजिलें आहे.

डिसेंबर महिन्याच्या शेवटच्या आठवड्यांत पुणें येथें पुणें विद्यापीठातर्फे अखिलभारतीय तत्त्वज्ञान-परिषदेचें अधिवेशन होणार आहे. या आधीं पुणें येथें अखिलभारतीय तत्त्वज्ञानपरिषदेचें अधिवेशन १९३४ सालीं भरलें होतें. त्यानंतर आज १७ वर्षांनीं अखिलभारतीय तत्त्वज्ञानपरिषदेच्या अधिवेशनाचा योग महाराष्ट्रांत येत आहे. या अधिवेशनाच्या निमित्तानें साहजिकच उत्पन्न होणाऱ्या वैचारिक वातावरणाचें निमित्त घेऊन, 'नवभारता' नें 'तत्त्वज्ञानविशेषांक' काढावयाचें योजिलें आहे.

तत्त्वज्ञानासारख्या अफाट विषयाचा योग्य असा नुसता ओझरताहि परामर्श एका अंकांत घेणें हें दुष्कर आहे. हें जाणून नियोजित 'तत्त्वज्ञान-विशेषांका'चें क्षेत्र एका विशिष्ट कालखंडापुरतेंच मर्यादित केलें आहे. विशेषतः गेल्या सुमारें पन्नास वर्षांत तत्त्वज्ञानाच्या क्षेत्रांत हिंदुस्थानांत आणि पाश्चात्त्य देशांतून जे विचारप्रवाह उत्पन्न झाले, त्यांपैकीं अत्यंत प्रमुख आणि प्रभावी अशा विचार-प्रवाहांचा आणि त्या विचारप्रवाहाला प्रेरणा देणाऱ्या प्रमुख व्यक्तींच्या प्रमुख विचारांचा संक्षिप्त परिचय आणि समालोचन या विशेषांकांत करून द्यावयाचें योजिलें आहे. या अंकाच्या द्वारें श्रीअरविंद, प्रा. कृष्णचंद्र भट्टाचार्य, प्रा. सर्वपल्ली राधाकृष्णन् इत्यादि भारतीय विचारवंतांचे विचार, पाश्चात्त्य तत्त्वज्ञ व्हाइटहेड, रसेल इत्यादींचे विचार, महाराष्ट्रांतील मार्क्सवादी तत्त्वमीमांसा, पाश्चात्त्य तत्त्वज्ञानक्षेत्रांतील डायलेक्टिकल मटीरिॲलिझम्, प्रॅग्मॅटिझम्, एक्झिस्टेन्शिॲलिझम्, लॉजिकल पॉझिटिव्हिझम् इत्यादि विचार-संप्रदाय यांचा त्रोटक परिचय तज्ज्ञांनीं करून दिलेला वाचकांस पहावयास मिळेल.

या अंकांतील लेखांबाबत प्रा. शं. वा. दांडेकर, प्रा. दे. द. वाडेकर, प्रा. श्री. गो. हुल्याळकर, प्रा. वा. कृ. कोठुरकर, आचार्य शं. द. जावडेकर, त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी, श्री. दि. के. बेडेकर, प्रा. श्रीनिवास दीक्षित, प्रा. दि. द. माहुलकर, रावसाहेब पटवर्धन, श्री. चंद्रोदय भट्टाचार्य, म्हैसूर विद्यापीठाचे प्रा. नारायणराव निकम, सागर विद्यापीठाचे प्रा. राशबिहारी दास इत्यादि आपापल्या क्षेत्रांतील अधिकारी लेखकांचें साहाय्य लाभलें आहे. यावरून या विशेषांकाच्या भरगच्च अंतरंगाची कल्पना येऊं शकेल. साहजिकच हा अंक 'नवभारता' च्या नेहमींच्या अंकापेक्षां मोठा म्हणजे शंभर पानांच्या-वर होणार आहे. अशा तऱ्हेनें आपल्या समकालीन प्रमुख प्रेरक विचारांचें तज्ज्ञांनीं करून दिलेलें दर्शन- ओझरतें का होईना—एका अंकाच्या कक्षेंत एकत्र सादर केलेलें वाचकांस औचित्यपूर्ण, उद्बोधक आणि स्वागतार्ह वाटेल असा विश्वास वाटतो.

तत्त्वज्ञानपरिषदेचें उद्घाटन मध्यवर्ती सरकारचे मंत्री ना. न. वि. गाडगीळ यांच्या हस्तें ता. २७ डिसेंबरला होणार आहे. त्याच प्रसंगीं आमच्या विनंतीवरून ना. न. वि. गाडगीळ यांनीं 'नवभारता' च्या तत्त्वज्ञानविशेषांकाचें प्रकाशन जाहीर करण्याचें मान्य केलें आहे. तत्त्वज्ञानपरिषदेच्या अधिवेशनाचे स्थानिक कार्यवाह यांनीं 'नवभारता'-च्या तत्त्वज्ञानविशेषांकाच्या प्रकाशनास आपल्या अधिवेशनाच्या कार्यक्रमांत जागा देण्याचें आणि ना. न. वि. गाडगीळ यांनीं प्रकाशन जाहीर करण्याचें मान्य करून 'नवभारता' च्या तत्त्वज्ञान-सेवेच्या या प्रयत्नास जें प्रोत्साहन दिलें आहे, ह्याबद्दल आम्ही उभयतांचे ऋणी आहोंत.

**— वि. म. बेडेकर**

# 'नवभारत' प्रकाशनमाला

'नवभारत' मासिकाच्या नोव्हेंबर १९५१ च्या अंकांत दीपावलीच्या निमित्तानें श्री. प्रेमा कंटक यांनीं लिन युथांग यांच्या मूळ कादंबरीवरून अनुवादिलेली 'पंकज' नांवाची कादंबरी दिली होती. ती आज स्वतंत्र पुस्तकाच्या रूपानें 'नवभारत' प्रकाशनमालेचें पहिलें पुष्प म्हणून आम्ही आनंदानें प्रकाशित करीत आहोंत.

'नवभारत' मासिकांतून उदित होणाऱ्या 'नवभारत' प्रकाशनमालेचा हा उपक्रम वाचकांस स्वागतार्ह वाटेल अशी अपेक्षा आहे. 'नवभारत' मासिकानें गेल्या चार वर्षांत अनेक विषयांवर उच्च

आणि विविध प्रकारचें साहित्य वाचकांना पुरविलें आहे. त्या लेखसाहित्यांतील कांहीं प्रासंगिक वा नैमित्तिक विषयांवरील स्फुट लेख सोडून दिल्यास, राहिलेल्या इतर बऱ्याच लेखांचें महत्त्व चिरस्थायी स्वरूपाचें आहे. असे चिरस्थायी स्वरूपाचे लेख, मासिकाच्या अपरिहार्य मर्यादांमुळें साहजिकच, इतस्ततः मासिकाच्या अंकांतून विखुरलेले असतात. असे लेख विषयवार एकत्र करून सुसंगत रचनेच्या स्वरूपांत वाचकांस उपलब्ध झाल्यास, विविधविषयजिज्ञासू अभ्यासकांची मोठीच सोय होईल हें कोणालाहि पटण्यासारखें आहे. अर्थात् अशा सर्व लेखसाहित्याचें विषयवार वर्गीकरण करून तें सर्व प्रकाशित करणें व्यवहारतः दुष्कर आहे. तरी पण त्यांतल्या त्यांत आर्थिक व्यवहार्यतेच्या मर्यादा सांभाळून, चिरस्थायी स्वरूपाच्या लेखांतून शक्य असेल तो मजकूर निवडून, त्याची विषयवार रचना करून, तो लघुग्रंथांच्या रूपानें 'नवभारत' प्रकाशनमालेंतून द्यावयाचा संकल्प आम्हीं केला आहे. अशा तऱ्हेनें एका विषयसूत्रांत गुंफलेल्या लेखांचे हे छोटे गुच्छ वाचकांस त्या त्या विषयाच्या दृष्टीनें अभ्यसनीय, संदर्भयोग्य आणि संग्राह्य वाटतील असा विश्वास वाटतो.

या आमच्या संकल्पास प्रस्तुत 'पंकज' या ललित साहित्यकृतीच्या प्रकाशनानें आम्हीं प्रारंभ करीत आहोंत. यापुढील जे लेखसंग्रह पुस्तकरूपानें 'नवभारत' प्रकाशन म्हणून द्यावयाचा आमचा संकल्प आहे, त्यांपैकीं कांहींचा निर्देश करतां येईल : (१) गांधीजींचें विविध दर्शन (गांधीजींच्या जिवनावर व विचारप्रणालीवर 'नवभारतां'-तून आलेल्या निवडक लेखांचा संग्रह). (२) साध्य-साधन-विवेक ('गीता, टिळक आणि गांधी' या विषयाच्या निमित्तानें 'नवभारतां'तून आलेल्या कांहीं निवडक लेखांचा संग्रह). (३) लघुकथा-संग्रह ('नवभारतां'त आलेल्या निवडक कथांचा संग्रह).

याशिवायहि आणखी कांहीं प्रकाशनें सादर करावयाचा आमचा संकल्प आहे. तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे मार्क्सवादावर समीक्षापर असे मूलग्राही तीन लेख गेल्या वर्षीं 'नवभारतां'त येऊन गेले आहेत. ही लेखमाला अजून अपुरी आहे. त. ती. लक्ष्मणशास्त्री मार्क्सवादाच्या इतर पैलूंचें समीक्षण करणारे कांहीं लेख अजूनहि लिहिणार आहेत. ते आल्यावर ही सबंध लेखमाला स्वतंत्र लघुग्रंथाच्या रूपानें 'नवभारत' प्रकाशन म्हणून आम्ही सादर करणार आहोंत. त्याचप्रमाणें प्रा. गं. बा. सरदार यांनीं या वर्षी पुढील अंकांतून 'वस्तुवादी इतिहासमीमांसा' या विषयावर एक लेखमाला द्यावयाचें आश्वासन दिलें असून, तीहि लेखमाला 'नवभारतां'तून पुरी झाल्यावर 'नवभारत' प्रकाशन म्हणून लघुग्रंथरूपानें आम्ही देणार आहोंत. हे दोन्ही ग्रंथ 'नवभारत' प्रकाशन म्हणून आगाऊ जाहीर करण्यास त. ती. लक्ष्मणशास्त्री जोशी आणि प्रा. गं. बा. सरदार यांनीं आम्हांस अनुज्ञा दिली आहे. त्यांच्या 'नवभारता'-वरील या लोभाबद्दल आम्ही फार कृतज्ञ आहोंत.

आणखी एका दृष्टीनेंहि 'नवभारत' प्रकाशनमाला अनुकूल काळीं सुरू होत आहे, हें दिसून येईल. आज उच्च शिक्षणाच्या माध्यमाचा प्रश्न विचारवंतांपुढें अत्यंत निकडीचा असून, त्याचा निर्णय लवकरच, प्रादेशिक भाषांना अनुकूल असा लागणें आमच्या मतें अपरिहार्य आहे. 'नवभारत' मासिकांतून विद्वान् लेखक ज्या अनेक विषयांवर लेख लिहितात, ते विषय या ना त्या रूपांत उच्च विद्यापीठीय शिक्षणाच्याहि कक्षेंतले असतात. अशा विषयांवर लिहिलेल्या विविध, अभ्यासपूर्ण लेखांतून निर्माण होणारीं 'नवभारत' - प्रकाशनें उच्च शिक्षणक्षेत्रांतील अभ्यासकांची मोठीच उणीव दूर करतील असा आमचा दृढ विश्वास आहे.

'नवभारत' मासिक ज्या उच्च वैचारिक पक्षनिरपेक्ष स्वरूपांत चालविलें आहे, त्या स्वरूपांत तें चालविण्यास आर्थिक साहाय्याची निकडीची अपेक्षा आहे. 'नवभारता'ला वर्गणीच्या, देणगीच्या रूपानें वा जाहिराती देऊन साहाय्य करावें, अशी विनंति आम्ही सदैव करीत आलों आहोंत. त्या जोडीला 'नवभारत' प्रकाशनमालेनेंहि 'नवभारता'ला आर्थिक हातभार लावावा, हाहि हेतु प्रस्तुत 'नवभारत' प्रकाशनाच्या उपक्रमामागें आहे, हें मोकळेपणानें सांगावेंसें वाटतें. म्हणून व्यक्तींनीं, वाचनालयांनीं, संस्थांनीं आमच्या 'नवभारत' प्रकाशनांना उदारपणें साहाय्य करावें, अशी सविनय प्रार्थना आहे.

— शंकरराव देव







अनुक्रमणिका

प्रा. हसमुख धीरजलाल सांकलिया

# प्राचीन आणि प्रागैतिहासिक महाराष्ट्र

महाराष्ट्राचा किंवा हिंदुस्थानचा प्राचीन इतिहास, आधुनिक ऐतिहासिक साधनांच्या दृष्टीनें पाहतां, साधारणपणें इ. स. पूर्वी ४ थ्या शतकापासूनचा उपलब्ध आहे. महान् विजेता अलेक्झँडर हिंदुस्थानांतून इ. स. पूर्वी ३२६ मध्यें परत गेला आणि पुढें पांच-सहा वर्षांतच सबंध उत्तर हिंदुस्थान आणि दक्षिण हिंदुस्थानचा कांहीं भाग मौर्य राजवंशाच्या अधिकाराखालीं आला. अशोकाचें साम्राज्य दक्षिणेकडे म्हैसूरपर्यंत पसरलें होतें. अर्थातच त्या साम्राज्यांत महाराष्ट्राचा समावेश झाला असलाच पाहिजे. परंतु त्या वेळीं त्या भागांत प्रादेशिक राज्य कोण चालवीत होते ह्याबद्दलची माहिती मात्र मिळत नाहीं. त्यानंतर दोन शतकांनीं जेव्हां सम्राट् खारवेल पूर्व हिंदुस्थानांत राज्य करीत होते—तेव्हां पश्चिम हिंदुस्थान सातकर्णि राजांकडे होता, अशा प्रकारची माहिती खारवेलनीं आपल्या शिलालेखांत सांगितली आहे. हा सातकर्णि आंध्र किंवा सातवाहनवंशाचा होता. आंध्रकुल हें फार प्राचीन आहे. कारण ऐतरेय ब्राह्मणांत आणि पुराणांत त्याचा उल्लेख आलेला आहे. मौर्यसाम्राज्याच्या विनाशानंतर सातवाहनराजघराण्यानें मध्य, पूर्व आणि पश्चिम हिंदुस्थानचा कांहीं भाग यांवर राज्य केलें. तें इ. स. च्या तिसऱ्या शतकापर्यंत चालू होतें.

सातवाहनाचा इतिहास म्हणजे महाराष्ट्राचा प्राचीन इतिहास. हा इतिहास सातवाहन आणि त्याचा समकालीन अहरात आणि क्षत्रप यांचे शिलालेख व शिक्के यांवर आधारलेला आहे. असे शिलालेख महाराष्ट्रांत लेण्यांमध्यें कोरलेले आढळतात. डॉ. देवदत्त भांडारकर यांनीं ह्या शिलालेखांचा सखोल अभ्यास करुन त्या काळच्या सामाजिक, धार्मिक आणि आर्थिक चालीरीतींवर खूप प्रकाश पाडला आहे. परंतु जोंपर्यंत ह्यापेक्षां अधिक साधनें उपलब्ध होत नाहींत, तोंपर्यंत कांहीं निश्चित अनुमानें करतां येणें कठिण आहे.

प्राचीन महाराष्ट्रांत लोकांचें जीवन कसें होतें; त्यांचीं नगरें, राहण्याचीं घरें, स्त्री-पुरुषांचे वेष आणि आभूषणें कशा प्रकारचीं होतीं, तसेंच ते वापरत असलेलीं भांडीं, अन्नादिकांचे निरनिराळे प्रकार कोणते होते ह्यांविषयीं माहिती होणें आवश्यक आहे. परंतु अशा तऱ्हेची माहिती वाङ्मयावरून मिळत नाहीं. शिवाय, ह्या वस्तू अनेक ठिकाणीं जमिनींत पुरलेल्या अवस्थेंत असणें शक्य आहे. त्यासाठीं शास्त्रीय पद्धतीनें उत्खनन करणें हाच एकमेव उपाय ठरतो.

शास्त्रीय उत्खननाची आवश्यकता दुसऱ्या दृष्टीनेंहि अतिशय महत्त्वाची आहे. उत्खननांतून आपणांस स्तरबद्ध इतिहास समजून येतो. सातवाहनापूर्वी व नंतर महाराष्ट्रांत कोणत्या प्रकारची संस्कृति होती हें ठरविण्यास शास्त्रीय उत्खननाचा फार उपयोग होतो. मुंबईहून पुण्याला रेल्वेनें निघालों असतां दादर, कल्याण, कर्जत, लोणावळा व नंतर पुणें अशा क्रमानें स्टेशनें येतात, हें रेल्वेच्या वेळापत्रकावरून आपणांस समजतें. तशाच प्रकारें हिंदु किंवा महाराष्ट्र-संस्कृतीचा उद्भव आणि उत्तरोत्तर विकास कसा झाला हें उत्खननांत मिळणारे निरनिराळे ‘ सांस्कृतिक थर ’ आणि त्यांचे खालच्या व वरच्या थरांशीं असलेले परस्पर संबंध यांवरून समजून येतें.








सातवाहन आणि मौर्य राजांच्या पूर्वी महाराष्ट्रांत कोण राज्य करीत होते ह्याबद्दलची थोडीफार माहिती पुराणें आणि जैन व बौद्ध वाङ्मय यांमध्यें मिळते. त्यांत विदर्भ ( हल्लींचा वऱ्हाड ), अश्मक आणि पूलक ज्या तीन राज्यांचा निर्देश आलेला आहे. परंतु तोहि केवळ नाममात्रच आहे. त्यावरून त्या काळच्या नागरिक संस्कृतीची कांहींच कल्पना येत नाहीं. अशा प्रकारें ज्या काळांत घडलेल्या गोष्टींचा पुराणें वगैरेंतून उल्लेख आहे पण ज्यासंबंधीं कांहीं लिखित वा भौतिक पुरावा मिळत नाहीं, त्याला आपण पौराणिक अथवा 'आद्य-ऐतिहासिक काळ' समजूं.

ह्या 'आद्य–ऐतिहासिक' कालाच्याहि पूर्वी महाराष्ट्राची संस्कृति कशी होती ? ती आर्य होती किंवा अनार्य होती ? ह्याबद्दलचा उल्लेख आपल्या प्राचीनतम साहित्यांतहि नाहीं. अशा प्रकारें लिखित किंवा उल्लिखित कालाच्याहि पूर्वीचा काळ म्हणजे प्रागैतिहासिक युग होय.

'डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट रिसर्च इन्स्टिटयूट' मधील संशोधकांनीं गेल्या दशकांत आणि ह्या वर्षीं वर सांगितलेल्या सर्व ऐतिहासिक आणि प्रागैतिहासिक कालामधील अनेक गोष्टींवर नवीन महत्त्वाचा प्रकाश पाडला आहे.

**कोल्हापुरजवळील दोन हजार वर्षांपूर्वीचें जीवन**

१९४५–४६ मध्यें कोल्हापूरजवळ ब्रह्मगिरि येथें जें उत्खनन करण्यांत आलें त्यांत असें आढळून आलें कीं, हल्लीं जेथें कोल्हापूर शहर आहे तेथेंच खिस्ताच्या वेळींसुद्धां एक नगर होतें. पश्चिम हिंदुस्थानच्या त्या काळच्या सर्व नगरांमध्यें कदाचित् हें नगर जास्त विशाल आणि भव्य असावें. त्यांतील घरें भाजलेल्या विटांचीं बांधलेलीं होतीं. आणि घरांचा पायाहि फार काळजीपूर्वक घेतलेला दिसून आला. पंचगंगानदींतील गोटे चिकट तांबड्या अगर काळ्या मातींत मिसळून अशा प्रकारें तीन फुटांच्या पायाचें बांधकाम त्या वेळीं करीत होते. त्यावर १०–१५ फूट भिंत बांधीत. भिंत बांधतांनाहि विटांचे दोन थर असे ठेवीत कीं, त्यांचे सांधे एके ठिकाणीं येऊं नयेत. ( English Bond प्रकार असाच आहे ). स्थापत्य शास्त्रदृष्ट्या विचार करतां विटांच्या अशा बांधणीमुळें घरें जास्त बळकट होतात. दोन हजार वर्षांपूर्वीं ह्या प्रकारचीं घरें बांधण्याची पद्धति कोल्हापुरांत प्रचलित होती. प्रत्येक घराला स्वयंपाकाची जागा धरून चार खोल्या असाव्यात असें वाटतें. स्वयंपाकघराची व्यवस्थाहि एका विशिष्ट पद्धतीनें केलेली होती. खोलीच्या एका बाजूस दोन चुली असत आणि दुसरीकडे खोलपर्यंत एक रांजण पुरलेला असे. ह्यामधील जागा विटांच्या तुकड्यांनीं भरून वर तांबड्या मातीनें व शेणानें नीट लिंपून घेत असत. चूल तीन वाटोळे दगड घेऊन केलेली असे. ह्या दगडांनाच माती व शेण लावून घट्ट करीत असत व बाहेरच्या बाजूस मातीची अर्धचंद्राकार बांधणी केलेली असे. याचा उद्देश असा कीं, राख आंत सांचून रहावी आणि स्वयंपाकघरांत इतरत्र पसरूं नये. चुलीच्या अगदीं शेजारीं अतिशय मोठा पाटा-वरवंटा ठेवलेला ह्या उत्खननांत आढळला. अलीकडील प्रकारापेक्षां तो निराळा असून त्याला चार पाय होते आणि एक टोंक थोडें बाहेर काढलेलें असें होतें, त्यामुळें वाटण्याच्या वेळीं ताट त्याच्या खालीं ठेवण्याची सोय होती. घरावरील कौलेंहि विशिष्ट पद्धतीचीं बनविलेलीं सांपडलीं. हल्लीं जशीं मंगलोरी कौलें आहेत तशींच प्राचीन काळीं, पण हल्लींपेक्षां तीं मोठीं होतीं. प्रत्येक कौलाच्या वरच्या बाजूस एक खोल रेघ असे आणि मागील बाजूस दोन छिद्रें कोरलेलीं असत. ह्या छिद्रांत लोखंडी खिळे ठोकून लांकडी छपरावर कौलें पक्कीं बसविण्याची सोय केलेली असे. एके काळीं अशा प्रकारचीं कौलें व पाटे-वरवंटे सर्व हिंदुस्थानांत प्रचलित होते. नंतर गांवटी कौलें व पायाचे पाटे अस्तित्वांत आले.

कोल्हापुरांत अजून उत्खननाची पुष्कळच आवश्यकता आहे. तें झालें तर घरादिकांची जास्त माहिती मिळण्याचा संभव आहे. त्या काळीं रोज व सणासुदीच्या दिवशींसुद्धां बहुतेक मातीचींच भांडीं लोक वापरीत होते. त्या भांड्यांतहि कलेच्या दृष्टीनें बरेच प्रकार दिसून येतात. ताट, थाळी, खुजे, तांब्या, लोटे, पणती आणि निरनिराळ्या लहान-मोठ्या वाट्या व झांकणें इत्यादि








अनेक प्रकारचीं भांडीं आपण ज्याप्रमाणें सध्यां वापरतों तशीं त्या काळांत कोल्हापूरवासी वापरीत होते. सणाच्या वेळीं आपण चांदीचीं अगर आतां जर्मन सिल्व्हरचीं वा स्टेनलेस स्टीलचीं भांडीं उपयोगांत आणतों, तशींच पूर्वीं कोल्हापुरांत नव्हे तर सर्व हिंदुस्थानांत सुंदर रोमन भांडीं वापरीत असत. लहान आकाराचा व लांब तोटीचा चंबू हा मद्य घेण्यासाठीं असावा. सुंदर रोमन स्त्रिया आणि दारू हिंदुस्थानांतील राजे ह्या देशांत आयात करीत असल्याचें त्या वेळचा एक रोमन लेखक सांगतो. खुज्यासारखा चंबू आणि एक लहान वाटी एका स्वयंपाकघराच्या फरशीवर आम्हांस उत्खननांत आढळून आलीं. रोमन साम्राज्याबरोबर व्यापारी व इतर संबंध ह्या देशाचे असावेत असें ह्यावरून सिद्ध होतें. त्याच घरांत ग्रीक देवतेची मानवाकार मूर्ति, ग्रीक किंवा रोमन जोडपें (?) आणि रोमन चंबू पूर्वीं मिळाले होते.

शिधासामग्रीहि कांहीं भांड्यांत आढळली. जळालेले तांदूळ, नाचणी आणि थोडेसे हरबऱ्याचे दाणे भांड्यांत सांपडले. सध्यां ज्या प्रकारचा तांदूळ कोल्हापूरजवळ पिकतो त्याच प्रकारचा तांदूळ २००० वर्षांपूर्वीं तेथें लोक खात असावेत, असें वरील शोधावरून वाटतें. त्या तांदुळांत फरक पडलेला नाहीं. हरभऱ्याचें अस्तित्व बरेंच महत्त्वाचें आहे. हें धान्य हिंदुस्थानांत बाहेरून आलेलें आहे, हें निश्चित. घोडे बाळगणाऱ्या माणसांनीं तें बहुधा आणलें असावें. कोल्हापुरांत इसवी सनाच्या आसपास लोक हरभरा वापरीत होते. त्यापूर्वींच्या काळांतहि त्याचा उपयोग हिंदुस्थानांत प्रचलित होता हें यावरून कळतें. उत्खननांत धान्य सांपडलें याचा अर्थ असा कीं, सर्व नागरिक शाकाहारीच होते. एका घरांत हरिणाचा संपूर्ण सांगाडा दृष्टीस पडला. हरणाचें मांस अत्यंत कोमल असून नेहमीं तें एक विशिष्ट पक्वान्न म्हणून गणलें जातें. सध्यां जसें मराठासमाजांत मांसभक्षण सामान्य आहे, त्याप्रमाणेंच पूर्वींहि असण्याची शक्यता आहे. एकाद्या धनिकाचेंहि हें घर असावें ! कालिदास जसें 'शाकुंतलां'त वर्णन करतो त्याप्रमाणें हरिण हा एक प्राणी म्हणून पाळलेला असणेंहि शक्य आहे.

स्त्रीपुरुषांचा पोषाख त्या वेळीं कसा होता ह्यासंबंधींचा निश्चित पुरावा अद्याप सांपडलेला नाहीं. परंतु एवढें मात्र खरें कीं, ते कापसाचे कपडे नेसत असत. कारण थोडा कापसाचा धागा वरील उत्खननांत सांपडला आहे. संपूर्ण कपडे सांपडत नाहींत. परंतु दागिने मात्र भरपूर आढळून आले. दागिन्यांचा सोस मानवाला जितका आहे तितका अन्य अनावश्यक वस्तूंचा दिसून येत नाहीं ! कोल्हापुरांत अनेक तऱ्हेचे स्फटिक, गोमेद इत्यादि सामान्य किंमतीचे मणी, कांचेचे आणि सोन्याचे मणी आणि मातीचेहि बनविलेले मणी सांपडले. कांच व सोन्याचे मणी दिसण्यांत साधारण आहेत. परंतु त्यावरून रोमन संस्कृतीचा प्रसार हिंदुस्थानमध्यें निश्चितपणें झाला असावा असें वाटतें. मण्यांप्रमाणेंच हस्तिदंत, लाख, हाडें व माती ह्यांपासून बनविलेल्या विविध प्रकारच्या बांगड्याहि मिळाल्या आहेत. यांमध्यें बहामनी काळची (इ. स. १४००) कांचेची बांगडी अतिशय सुंदर आहे. सोन्याचे दागिनेहि त्या वेळीं वापरीत असावेत. आम्हांस आढळले नाहींत, एवढेंच !

तरवार, चाकू, बाणाचीं टोंकें इत्यादि शस्त्रें व परशु, कुऱ्हाड, कोयता वगैरे प्रकारचीं हत्यारें लोखंडाचीं होतीं. तांबें आणि जस्त पूर्वीं मानव वापरीत होते. परंतु ह्या काळांत मात्र लोखंडच जास्त प्रचलित असावें. दळावयाचीं जातीं किंवा घंटी अद्याप सर्वसाधारण प्रचारांत आलेलीं नव्हतीं. तांदूळ आणि चटणी वाटण्यासाठीं चारपायी पाटा सर्वत्र उपयोगांत आणला जात होता.

कोल्हापूरच्या उत्खननामुळें थोडीशीच का होईना, पण महाराष्ट्रांत २००० वर्षांपूर्वीं नागरिक जीवन कसें होतें, ह्याची माहिती मिळते. सातवाहन घराण्यांतील वासिष्ठीपुत्र, गौतमीपुत्र, यज्ञसेन इत्यादि राजे त्या काळीं कोल्हापुरांत राज्य करीत होते. ह्या राजांचीं शिक्यांचीं व तांब्याचीं पुष्कळ नाणीं वर सांगितलेल्या घरांत सांपडलीं आहेत. अशा विशाल नगराची उत्पत्ति कशी झाली हें मात्र सांगतां येत नाहीं. उत्खनन लहान जागेंत करण्यांत आलें. त्यावरून एवढें अनुमान निघतें कीं, कोल्हापूर









अनुक्रमणिका

पंचगंगा नदीच्या तीरावर ख्रिस्तपूर्व एकदोन शतकांत खडकावर वसलेलें असावें.

### नाशिक येथील उत्खनन

नगरसंस्था कशी आणि कोणत्या कालांत अस्तित्वांत आली हें समजण्यासाठीं दुसरीकडे पुरातन जागीं उत्खनन होणें आवश्यक होतें. अशा प्रकारची माहिती कदाचित् नाशिकला मिळेल अशी आशा वाटत होती. कारण, महाराष्ट्रांत तें अतिप्राचीन स्थल आहे. अथर्ववेदांत त्याचा उल्लेख आहे. महान् वैयाकरण पाणिनीनें नाशिक रहिवाश्यांना 'नासिक्याः' असें नांव दिलेलें आढळतें. आणि ख्रिस्तपूर्व ३ ऱ्या शतकानंतरच्या शिलालेखांत तर नाशिकचा वारंवार निर्देश येतो. महाभारतांतहि ह्या गांवाचा उल्लेख आहे. रामायणांत व भवभूतीच्या 'उत्तररामचरितां'त नाशिकचा उल्लेख नसला, तरी दंतकथेंत पंचवटी, तपोवन इ. ठिकाणीं राम, सीता व लक्ष्मण राहात होते असा उल्लेख आहे. त्यामुळें हें यात्रेचें ठिकाण झालें असलें पाहिजे.

दोन वर्षांपूर्वीं, नाशिकजवळील एका टेकडीवर प्राचीन मातीच्या भांड्यांचीं खापरें, विटांचे व कौलांचे तुकडे, हाडांचीं हत्यारें इत्यादि सांपडतात अशी बातमी आम्हांस कळली. ह्या सर्व वस्तू कोल्हापूरप्रमाणेंच होत्या. ह्या सर्व वस्तू टेकडीच्या पृष्ठभागावर जरी सांपडल्या, तरी त्या टेकडीच्या आंत प्राचीन संस्कृतीचीं कांहीं साधनें असावीत, ह्याबद्दलची निश्चित कल्पना आली. तेव्हां त्या जागीं उत्खनन करावें असें ठरलें. परंतु शास्त्रीय उत्खननाला, जरी तें लहान प्रमाणांत असलें तरी, तज्ज्ञ माणसें आणि भरपूर पैसा लागतो. डेक्कन कॉलेज संशोधनसंस्थेमध्यें ह्या प्रकारचीं योग्य माणसें आहेत. पण तीन महिनेपर्यंत उत्खनन करण्यास लागणारा पैसा मात्र नव्हता. गेल्या १० वर्षांत जें उत्खनन-कार्य ह्या संस्थेनें केलें तें सर दोराबजी टाटा आणि न. म. वाडिया यांच्या निधींतून मिळालेल्या आणि भारत सरकार व मुंबई विश्वविद्यालय यांनीं केलेल्या द्रव्यसाहाय्यामुळें झालें. कोल्हापूरच्या उत्खननाचा सर्व खर्च त्या संस्थानानें केला. नाशिकच्या उत्खननाच्या वेळीं आर्थिक अडचणींतून आम्हांला पुणें विद्यापीठानें मुक्त केलें. विद्यापीठाजवळ पुष्कळसा पैसा नाहीं हें सर्वांना माहीतच आहे. तथापि, प्राचीन भारतीय संस्कृतीच्या संशोधनासाठीं ठेवलेल्या निधींतून गतवर्षीं व ह्या सालीं मिळून ५००० रु. आम्हांला विद्यापीठानें दिले.

विद्यापीठाच्या साहाय्यानें झालेलें हिंदुस्थानांतील हें दुसरें उत्खनन आहे. १५ वर्षांपूर्वीं कलकत्ता विद्यापीठानें प्रथम सुरुवात केली. पण एक वर्षांतच ती योजना बंद पडली. नंतर अलाहाबाद विद्यापीठानें अलीकडे गेल्या ३ वर्षांपासून कौशांबीच्या टेकड्यांत उत्खनन सुरू केलें आहे. पुणें विद्यापीठानें या क्षेत्रांत प्रवेश करून चांगलीच भर घातली आहे.

अशा तऱ्हेनें पुणें विद्यापीठाच्या आश्रयाखालीं नाशिकला उत्खनन सुरू करण्यांत आलें. ज्या जागीं खड्डे घेतले त्या टेकडीचें नांव 'मातीची अथवा जुनी गढी' असें आहे. हल्लींच्या वाटगे-महाराजांची धर्मशाळा आणि स्मशान या दोन्हींच्यामध्यें, गोदावरीच्या उजव्या कांठावर हें ठिकाण आहे. टेकडी नदीसपाटीपासून ९६ फूट उंच आहे. बॉम्बे गॅझेटिअरच्या 'नाशिक खंडां'त असें सांगितलें आहे कीं, ह्या गढीवर मुसलमानी अंमलांत वास्तव्य सुरू झालें. त्याच वेळीं ह्यावर दगडाची भिंत बांधण्यांत आली. मुसलमानांच्या पूर्वीं नाशिक पंचवटींत होतें. मराठ्यांच्या काळीं हल्लींचें शहर अस्तित्वांत आलें.

आमचें उत्खनन—संशोधन-कार्य नाशिक येथें सुमारें ३ महिने चाललें. ह्या काळांत जुनी गढी, त्याच्या शेजारचा कुंभारवाडा आणि संगमनेरच्या पूर्वेस ५ मैलांवर असलेलें जोर्वे हें गांव ह्या ठिकाणीं खणण्यांत आलें आणि नाशिकच्या आसपास तपोवन, गोवर्धन, गंगापूर इत्यादि ठिकाणांची पाहाणी करण्यांत आली. ह्या संशोधनानें महाराष्ट्राच्या इतिहासावर पुष्कळच नवीन प्रकाश पडला आहे.

### उत्तरभारतीय संस्कृतीचा गोदातीरीं प्रसार

दोन हजार वर्षांपूर्वीं लोक कसे रहात होते, काय खातपीत होते, कोणतीं भांडीं वापरीत असत, त्यांची वेषभूषा, दागिने इ. कशाचे बनवीत असत आणि त्या काळीं भारत व महाराष्ट्र यांचे परराष्ट्रांशीं व्यापारी संबंध कसे होते ह्याबद्दलची बरीच माहिती












आपणांस कोल्हापूरच्या उत्खननानें करून दिली. नाशिकमधील संशोधनानें कळून आलें कीं, कोल्हापूरमधील नागरी संस्कृति नाशिकहून मुळींच भिन्न नव्हती. कोल्हापुरांत ज्या संस्कृतिसूचक वस्तू सांपडल्या अगदीं तशाच पण किंचित् नवीन प्रकारच्या वस्तू नाशिकमध्यें आढळून आल्या. ह्यावरून असें अनुमान निघतें कीं, त्या वेळीं महाराष्ट्रांत सगळीकडे नागरिक-जीवन एकाच पद्धतीचें असावें.

विटांचीं घरें बांधण्याची कला त्या वेळीं संपूर्णपणें माहीत होती. हल्लीं ज्याप्रमाणें सीमेंट-कॉंक्रीटचे ब्लॉक्स करतात, तसाच १९" × ११" × ४" आकाराच्या मोठ्या विटांनीं घरें बांधण्याची प्रथा नाशकांत प्रचलित होती. कोल्हापूरप्रमाणें येथें सबंध घराचा अवशेष सांपडलेला नाहीं. तथापि, त्या काळचीं घरें कशीं असत याची मात्र बरीच कल्पना ह्या लहानशा भागावरून येते.

वरील प्रकारच्या घरांत राहणारे लोक आणि बौद्ध भिक्षू यांना घरांमध्यें स्वच्छता कशी ठेवावी याची चांगली माहिती असल्याचें दिसतें. घरांतील केरकचरा टाकण्यासाठीं प्रत्येक घरांत अतिशय खोल खड्डा खणून त्याची आंतील बाजू भाजलेल्या विटांनीं नीट बांधून घेत असत. त्याला इंग्रजींत 'soak-pit' आणि गुजरातींत 'खालकुवा' असें नांव आहे. हे खड्डे चांगले मजबूत बांधले असल्यामुळें, आम्हांला जसेच्या तसे १५ फूट खोलीवर सांपडले. ह्या खड्ड्यांचा पाया थेट काळ्या मातीपर्यंत खूप खोल घेतलेला आढळला. त्यामुळें पिण्याच्या पाण्याच्या विहिरींत घाण पाणी जाण्याचा संभव नव्हता.

कोल्हापूरमध्यें जेवढे प्राचीन घरगुती भांड्यांचे प्रकार मिळाले होते त्यापेक्षां जास्ती प्रकार नाशिकला मिळाले. ह्यांत सर्वांत आश्चर्यजनक भांडें म्हणजे पाणी पिण्याचें टंब्लर. आपली अशी कल्पना असते कीं, पाश्चात्त्य संस्कृतीच्या संपर्कामुळेंच रोजच्या वापरण्यांत 'ग्लास' ही वस्तु अनिवार्य स्वरूपाची झाली आहे. परंतु २००० वर्षांपूर्वी बनविलेला ग्लास जो नाशिक येथील उत्खननांत सांपडला, त्यावरून आतां आपल्याला आपलें मत बदलावें लागेल. त्या काळच्या व हल्लींच्या ग्लासांत फरक एवढाच कीं, पूर्वींचा मातीचा असे व आतां कांचेचा, चिनीमातीचा असतो.

त्या काळीं मद्य हें रोमन भांड्यामध्येंच घेत असत असें नव्हे, तर त्या प्रकारच्या भांड्याचें अनुकरण करून, त्याला बाहेरून नारळाचा आकार देऊन, नारळाच्याच करवंटीप्रमाणें वर नक्षी करीत असत. ह्या तऱ्हेचें हें नाशिकमध्यें आढळलेलें भांडें अतिशय सुंदर आहे. अद्याप हिंदुस्थानांत अशा प्रकारचा नारळाकार चंबू सांपडलेला नाहीं. भारताच्या पूर्व-पश्चिम किनाऱ्यावरील गरीब अथवा धनिक लोकांचें नारळ हें एक आवडतें फळ आहे. व नारळासारखा चंबू हें नारळाच्या लोकप्रियतेचें एक उत्कृष्ट प्रतीक आहे.

नाशिकच्या संशोधनांत असें दिसून आलें कीं, सातवाहनकालीन संस्कृतीच्या पूर्वीं, खिस्तपूर्व तिसऱ्या शतकांत उत्तर हिंदुस्थानांतून बौद्ध भिक्षू इकडे आले होते व बरोबर त्यांनीं काळीं पण इनॅमलसारखीं अत्यंत गुळगुळीत आणि चकचकीत मातीचीं भांडीं आणिलीं होतीं. ह्या जातीचीं भांडीं उत्तर हिंदुस्थानांत तक्षशिलेपासून सबंध गंगा-यमुना—दोआब व राजस्थान, नर्मदातट व महेश्वर इ. स्थळीं पूर्वीं सांपडलेलीं होतीं. परंतु नर्मदेच्या खालच्या भागांत तीं अद्याप आढळलेलीं नव्हतीं. नाशिकमध्यें तीं सांपडल्यामुळें उत्तरेकडील एका विशिष्ट संस्कृतीचा प्रसार गोदावरीपर्यंत झाला होता हें निश्चितपणें कळतें. यापूर्वींसुद्धां मानवाचें वास्तव्य गोदावरीतटाकीं नाशिक ठिकाणीं होतें याचा पुरावा नाशिक, जोर्वे आणि गंगापूर ह्या तीन ठिकाणीं सांपडला आहे.

नाशकांत जुन्या गढीच्या टेकडींत सातवाहन व मौर्य काळाचे अवशेष टेकडीच्या माथ्यापासून चौथ्या व पांचव्या थरांत १५-२० फूट खोल गाडले गेलेले आहेत. ह्या थरांच्या खालीं काळ्याभोर चिकट मातीचा ५-६ फूट थर आहे. महाराष्ट्र, कर्नाटक व दक्षिण गुजरात इ० भागांत अशा प्रकारची माती पृष्ठभागावर आढळून येते. ही माती झाडें व दगड यांच्यावर हवामानाच्या झालेल्या परिणामामुळें बनली असावी असें तज्ज्ञांचें मत आहे. साधारणपणें ह्या थरांत कांहीं संस्कृतिसूचक मानवकृती सांपडत








नाहींत, असा अनुभव आहे. त्याचमुळें जेव्हां नाशिकला वीस फूट खोलीवर हा थर मिळाला तेव्हां आम्हांस वाटलें कीं, आतां वरील जातीची माती लागली असून त्यांत कांहीं सांपडणार नाहीं. हें सिद्ध करण्यासाठीं ह्या थरांतहि आम्हीं खणण्यास सुरुवात केली. परंतु ह्या थरांत जेव्हां तांबडसर, काळ्यारंगाचे त्रिकोण रंगविलेलीं रंगीत भांडीं व त्याबरोबर लहान लहान चाकूच्या पात्यासारखीं व चंद्रकोरीसारखीं दगडाचीं हत्यारें सांपडूं लागलीं, तेव्हां मात्र आम्हांस खूपच आश्चर्य वाटलें. एका भांड्याची सचित्र तोटी पण त्यांत आढळली. परंतु लोखंड, तांबें इ. ऐतिहासिककालसूचक कांहींहि वस्तु सांपडली नाहीं. तरीसुद्धां एवढें निश्चित कळलें कीं, ह्या थरांत प्रागैतिहासिक संस्कृतीच्या वस्तू सांपडतात. जुन्या गढीवर हा थर वीस फूट खोलीवर सांपडतो हें वर सांगितलेंच आहे. आसपासच्या सर्व टेकड्या उकरून ह्या थराची समग्र संस्कृति कशी होती, हें समजण्यासाठीं आमच्याजवळ पुरेसा पैसा आणि वेळ पण नव्हता.

## संगमनेरजवळ ताम्रपाषाणयुगीन संस्कृति

भाग्यवशात् अशाच संस्कृतीचे कांहीं अवशेष संगमनेरजवळ जोर्वे गांवीं आम्हीं पाहिले होते. संगमनेर येथें श्री. साळी आणि दातरंगे या दोन विद्याप्रेमी युवकांना जोर्वे गांवीं नवीन प्रकारचीं सचित्र भांडीं सांपडलीं होतीं. त्यांनीं त्याप्रमाणें 'भारत' दैनिकांत ही बातमी प्रसिद्धहि केली होती. त्या पत्राची एक प्रत पुणें विद्यापीठांतील श्री. गोरे यांनीं मला पाठवून दिली. मीं माझे सहकारी डॉ. मोरेश्वर दीक्षित यांना ही बातमी सांगितली. त्यांनीं लगेच नाशिकला उत्खननासाठीं निघण्याच्या वेळीं संगमनेरला भांडीं घेऊन भेटण्यास श्री. साळींना कळविलें. डॉ. दीक्षित तीं भांडीं घेऊन नाशिकला आले. ह्याच सुमारास भारतीय पुराणवस्तु-खात्यांतील पुण्याचे श्री. देशपांडे (सुपरिंटेंडेंट) यांनींहि पण श्री. साळींना भांडीं पुण्यास आणण्यास सांगितलें होतें. भांडीं मात्र विशिष्ट प्रकारचीं असून तशीं सचित्र तोट्यांचीं भांडीं महाराष्ट्रांत अद्यापि कोठेंहि आढळलीं नव्हतीं. तीं ज्या जागीं सांपडलीं, त्या जागीं त्याबरोबर दुसऱ्या कोणत्या वस्तू आढळल्या ह्याची माहिती मिळाल्याशिवाय त्याबद्दल कांहीं अनुमानें करणें कठिण होतें. नंतर दोनचार वेळां आम्हीं जोर्वे गांवीं जाऊन पाहाणी केली. नाशिकमध्यें अगदीं खालील थरांत जेव्हां दगडाचीं बारीक हत्यारें व खापराचे तुकडे सांपडले तेव्हां आमची खात्री झाली कीं, जोर्वे गांव हें प्रागैतिहासिक स्थळ आहे. जोर्वे गांव प्रवरा नदीच्या डाव्या तीरावर आहे. ह्या नदीचा मार्ग संगमनेर-पासून पूर्वेस ५ मैलांवर आहे. जेथें भांडीं वगैरे आढळलीं ती जागा एका लहानशा टेकडीवर आहे. ३–४ वर्षांपूर्वीं ह्या टेकडीवर वस्ती नव्हती. कारण, एका नष्ट नगराचें हें स्थान समजलें जातें आणि त्यामुळें भूतपिशाचांनीं पछाडलेली ही जागा आहे असें लोक मानतात. परंतु १९४१ सालांत प्रवरेस मोठा पूर आल्यामुळें लोकांना टेकडीवर रहाण्यास जाणें भाग पडलें. तेथें वस्ती सुरू झाल्यावर घर-बांधणीच्या वेळीं घेतलेल्या पायांत, खणलेल्या विहिरींत इ. जागीं वरील प्रकारचीं भांडीं सांपडलीं.

आमच्या उत्खननांत सबंध भांडीं एकदोनच सांपडलीं. परंतु रंगीत भांड्यांचीं कित्येक खापरें, बारीक दगडांचीं हत्यारें ९ फुटांपर्यंत सांपडलीं. ह्या ९ फूटांच्या भागांत मानववस्ती दोन वेळां झाली होती असें दिसतें. दगडांच्या हत्यारांबरोबरच तांब्यापासून बनविलेलें कुऱ्हाडीचें पान एका रंगीत भांड्यांत ठेवलेलें गांवकऱ्याला सांपडलें होतें. जोर्वे-नाशिक संस्कृतीमध्यें तीन विशिष्ट प्रकारच्या वस्तू आम्हांला पाहाण्यास मिळाल्या : (१) रंगीत सचित्र मातीचीं भांडीं, (२) दगडाचीं बारीक हत्यारें व (३) तांब्याचे दागिने व हत्यारें. ह्या गोष्टींवरून मानवी संस्कृतीच्या विकासावस्था कळून येतात. सिंधु नदीच्या खोऱ्यांत मोहेंजोदारो येथें व रावी खोऱ्यांतील हराप्पा येथें माणसें पूर्वी विटांच्या घरांत रहात असत व त्यांचीं हत्यारें बहुधा दगडाचीं आणि क्वचित् तांब्याचीं होतीं. इराण, इराक, भूमध्य समुद्रांतील क्रीट इ. देशांत खिस्तपूर्व ३००० वर्षें मानव ह्याच प्रकार-च्या अवस्थेंत होते व त्यांची संस्कृतीहि समान होती. त्याकाळीं लोखंडाची माहितीच नव्हती. तांबें वापर-ण्याचें माहीत होतें पण त्याचाहि उपयोग कमी प्रमाणांत केला जाई. त्यांच्या दैनंदिन व्यवहारांत

लागणारीं हत्यारें– उदा० धान्याचीं कणसें काढण्यास, फळें कापण्यास, बारीक नक्षीकाम करण्यास इत्यादि–दगडाचीं असत. हीं लहान हत्यारें लांकूड आणि हाडें ह्यांमध्यें डिंकानीं चिकटवीत व हातांत धरण्याच्या सोयीचीं करीत असत. नाशिक व जोर्वे येथें सांपडलेलें दगडाचें चाकूसारखें पातें अशाच कामासाठीं वापरलें जात असावें. ह्याचा अर्थ असा कीं, त्या वेळीं पाषाणयुग असून मानव हळू हळू धातुयुगांत प्रवेश करीत होता.

हिंदुस्थानांतील प्रागैतिहासिक संशोधनाच्या दृष्टीनें विचार करतां, जोर्वे येथील तांम्र-पाषाणयुगाच्या संस्कृतीचा शोध अतिशय महत्त्वाचा आहे. १०–१५ वर्षांपूर्वी इतिहासकारांचें असें मत होतें कीं, दाक्षिण भारतांत ताम्रयुग कधींच अस्तित्वांत नव्हतें. द. हैद्राबाद संस्थानांत रायचूर जिल्ह्यांत कल्लूर येथें नंतर एक तांब्याची तलवार सांपडली. १९४६–४७ मध्यें म्हैसूरमधील चितळदुर्ग जिल्ह्यांत ब्रह्मगिरीच्या उत्खननांत दगडाच्या लहान हत्यारांबरोबर तांब्याची एक लहान छिनी अगदीं शेवटच्या थरांत मिळाली. या दोन शोधांमुळें दक्षिण हिंदुस्थानांत ताम्रयुगसंस्कृति नव्हती अशा प्रकारचें वरील मत खोटें असावें असें वाटूं लागलें होतें. जोर्वे येथील संशोधनांत मिळालेल्या सहा तांब्याच्या कुऱ्हाडींमुळें आतां मात्र निश्चित झालें आहे कीं, महाराष्ट्रानें ताम्रपाषाणयुगाचीहि संस्कृति अनुभवलेली आहे. महाराष्ट्रांत अशा प्रकारें नान्दूर, मध्वेश्वर, निफाड इ. ठिकाणें व गोदावरीचा कांठ हीं पुराणवस्तुसंशोधनदृष्ट्या फार महत्त्वाचीं आहेत.

## दहा हजार वर्षांपूर्वींचीं आदिमानवाचीं हत्यारें

महाराष्ट्रांतील नद्यांचीं पात्रें पाऊस कमी पडल्यामुळें रेतीनें भरत असत. आतांच्या पात्रापासून पूर्वी नद्या ( उदा. गोदावरी ) ३०–४० फूट उंचावरून वहात होत्या. त्या वेळीं हीं लहान दगडी हत्यारें करणारीं माणसें त्यांच्या तीरावर रहात होतीं. हा काळ सुमारें १०, ००० वर्षांइतका जुना असावा. दगडाबरोबरच हाडांचींहि हत्यारें त्या वेळीं लोक करीत असत. गुजरातमध्यें अशा संस्कृतीच्या माणसांचे सांगाडे, तत्कालीन गायी, मेंढ्या, बकऱ्या, डुक्कर, हरिण, एक प्रकारचे हत्तीसारखे प्रचंड प्राणी, मासे, कांसवे, उंदीर इ. प्राण्यांचे अवशेष सांपडले आहेत.

नदी स्वतःचें पात्र वाळू इत्यादींनीं भरून काढते व हें भरलेलें पात्र परत कापून त्यामधून खालच्या पातळीवरून वहाते. कांहीं वेळां तर पात्र पूर्णपणें बदलतें. ह्याचा सुंदर पुरावा आम्हांला नाशिक, गंगापूर, कटलग इत्यादि ठिकाणीं पाहाण्यास मिळाला. ह्या प्रकारें निरीक्षण करतांना गंगापूरजवळ गंगावाडी येथें महाराष्ट्रांतील अगदीं आदिमानवसंस्कृतीचे अवशेष सांपडले.

गंगावाडीच्या पश्चिमेस त्र्यंबकचा डोंगर आहे. तेथून गोदावरी उगम पावून पूर्वेकडे वहात जाते. येथें साधारण सपाट मैदान आहे व तेथेंच सध्यां एक बंधारा बांधण्याचें काम सुरू आहे. ह्या प्रकारच्या बांधकामासाठीं खूप खणून खडकावर पाया घ्यावा लागतो. परंतु जेव्हां ६० फूट पर्यंत जाऊनहि खडक लागेना, तेव्हां एंजिनिअर लोक निराश झाले होते. त्यांना मग ३०–३५ फूट खोल एक चर (खाई) खणावा लागला व ती गोष्ट आमच्या दृष्टीनें चांगली झाली. गुजरातमध्यें साबरमती, मही इत्यादि नद्यांच्या तीरांवरील भागांत, बारीक वाळू, गुळगुळीत दगड आणि चिकट माती इत्यादींचे निरनिराळे थरांवर थर असे पांच-सहा थर दिसले. साबरमतीच्या कांठीं ह्या प्रकारच्या थरांत पृष्ठभागापासून ३० ते ६० फूट खोलीवर आदिमानवानें तयार केलेलीं दगडाचीं मोठीं हत्यारें सांपडलीं होतीं. गतवर्षीं कर्नाटकांत तामिनहाळ गांवाशेजारीं मलप्रभा नदीवर अशाच एका थरांत गुजरातप्रमाणेंच पाषाणयुगीन हत्यारें मिळालीं. गंगावाडी येथील थर पाहून वरील सर्व गोष्टींची आठवण एकदम आम्हांला झाली. महाराष्ट्रांत ह्या प्रकारचे थर आम्हांस अद्यापि आढळले नव्हते. महाराष्ट्रांतील भौगोलिक व भूस्तरविषयक परिस्थिति पाहातां गुजरात-कर्नाटकांप्रमाणें आदिमानवाचा पुरावा महाराष्ट्रांत मिळणें कठिण आहे, अशा प्रकारचें मत आमचें व लंडन विद्यापीठांतील प्रा. झॉयनर यांचें झालें होतें. परंतु गंगावाडीला मिळालेल्या नवीन अनुभवावरून आमचें हें मत खोटें ठरलें आहे. त्या ठिकाणीं अगदीं खोल वाळू









व गोटे यांच्या थरांत गुजरात, कर्नाटक व आफ्रिका ह्यांसारखीं दगडाचीं हत्यारें पूर्वस्थितींत असलेलीं आम्हांला सांपडलीं. गुजरात, महाराष्ट्र इत्यादि आधुनिक भागांत ऐतिहासिक कालांत राजकारण, भाषा व संस्कृति यांत भेद होते. प्रागैतिहासिक कालांत मात्र अशी देशमर्यादा नव्हती. म्हणूनच पाषाणयुगसंस्कृतीचा फैलाव ह्या देशमर्यादेवर अवलंबून राहिला नाहीं.

ही आदिपाषाणयुगाचीं हत्यारें कशीं आहेत, गंगावाडीच्या सध्यांच्या सपाटीपासून ३० फूट खालीं तीं कशीं आलीं आणि नंतर तेथील जागा भरून जाऊन सपाट कशी झाली इत्यादि शंका वाचकांच्या मनांत उत्पन्न झाल्या असतील. लाखों वर्षांची हवामान, नदी आणि मानव यांची ही कथा आहे ! केवळ महाराष्ट्रांतील मानव नव्हे, तर सर्व हिंदुस्थानांतील किंवा अखिल जगांतील आदि-मानव, तत्कालीन हवामानामध्यें पडलेले फरक व त्यांचा नद्यांवर झालेला परिणाम ह्या सर्वांचा समावेश ह्यांत होतो.

हत्यारें कशीं आहेत पाहा ! साधारणपणें नदींतील वाटोळे दगड किंवा रेल्वेच्या मार्गांत घातलेल्या दगडांप्रमाणें हीं हत्यारें प्रथमदर्शनीं वाटतात. परंतु सूक्ष्म दृष्टीनें पाहिलें असतां, कापण्यासाठीं किंवा खणण्यासाठीं म्हणून धार अथवा टोंक ह्या स्वरूपांत त्यांना एक निश्चित आकार, मुद्दाम विचारपूर्वक घडवून आणलेला दिसतो. मानवाव्यतिरिक्त अशीं हत्यारें दुसरें कोण बनविणें शक्य आहे ? अशीं हत्यारें एवढ्या खोलीवरील थरांत सांपडतात ह्यावरून मानवाचें तत्कालीन अस्तित्व सूचित होतें. प्रथम मानव रानटी अवस्थेंत होता. त्या वेळीं दगडाप्रमाणेंच लांकूड, हाडें इत्यादि वस्तूंचींहि हत्यारें बनवीत असतील. परंतु अशा वस्तू कुजून जाऊन नाश पावतात. दगड मात्र बऱ्याच काळपर्यंत टिकतात. मानवाचा स्वतःचा सांगाडा किंवा एखादें हाड ह्या कारणामुळेंच सांपडणें कठिण आहे. तेव्हां हीं दगडी हत्यारेंच केवळ त्या मानवाच्या अस्तित्वाचीं सूचक चिन्हें आहेत.

## गोदावरीनें बदललेलीं पात्रें

आतां हीं हत्यारें गंगापुरांत एवढ्या खोलीवर कशीं आलीं हा दुसरा प्रश्न ! गंगावाडीच्या पश्चिमेस त्र्यंबकचा डोंगर आहे. गोदावरी व इतर लहान मोठ्या नद्या ह्यांचा येथें उगम आहे. त्या सर्व पूर्ववाहिनी आहेत. सध्यां जेथून गोदावरी वहाते तो प्रदेश सपाट आहे. लाखों वर्षांपूर्वी महाराष्ट्राची भूमि उत्तरेस माळव्यापासून दक्षिणेस जवळजवळ धारवाड-पर्यंत लाव्हा-रसापासून तयार झाली. त्यानंतरच्या काळांत आद्य गोदावरी जेव्हां त्र्यंबकपासून निघून वाहूं लागली, तेव्हां येथें एक अतिशय खोल खोरें असेल. नदीमुळें ह्या खोऱ्यांत तळापासून वाळू, दगड, गोटे इत्यादींचा थर सांचला. हा थर आपणांस आतां दिसत नाहीं. कारण तो ६० फुटांच्या खालीं आहे. जमिनींत यंत्रानें खोलवर घेतलेल्या भोंकामुळेंच त्याचें अस्तित्व लक्षांत आलें आहे. मानव ह्या वेळीं तेथें रहात होता कीं नाहीं हें सांगतां येत नाहीं. हा थर तयार झाल्यावर नदीनें आपलें पात्र बदललें असावेसें वाटतें. कांहीं काला-नंतर नदी पुन्हां त्याच पहिल्या थरावरून वाहूं लागली आणि वाळू इत्यादींचा दुसरा थर तयार झाला. मानव ह्या समयीं त्या नदीतीरावर रहात असावा. म्हणूनच त्याची तत्कालीन दगडी हत्यारें ह्या थरांत आढळतात. हवामान त्यानंतर निश्चितपणें बदलल्याचें वाटतें. कारण तिसरा थर हा काळ्या चिकण मातीचा आहे. गाळ, जंगलें, तलाव इत्यादि कारणां-मुळें हा बनला असावेसें वाटतें. परंतु तिसऱ्यांदा व चौथ्यांदा नदी तेथें पुन्हां वाहूं लागली आणि त्या काळांत पूर्वींच्या थरांवर १५–२० फुटांची बारीक घट्ट वाळू, जाड वाळू आणि गोटे, त्यावर पुन्हां बारीक वाळू, पिवळी माती, बारीक वाळू असे थरांवर थर रचले गेले. नंतरचे तीन थर झाले तेव्हां मानव तेथें नव्हता. नाशिक, नान्दूर, मध्येश्वर येथें ज्या वाळूचा थर आहे तसाच गंगावाडी येथें वरचा थर आहे. ह्यांत दगडाचीं बारीक हत्यारें आम्हांला पूर्वी सांपडलीं होतीं. म्हणून ह्या काळाची मानवी संस्कृति निराळी होती असें निश्चित सांगतां येतें. एवढें झाल्यानंतर नदीनें पात्र बदललें आणि काळ्या मातीच्या थरानें हल्लींची जमीन बनली. आतां नदी गंगावाडीपासून ३–४ फर्लांगावरून वाहते.








प्रागैतिहासिक कालांत नदी जी ह्या जागेवरून गेली ती त्या ठिकाणीं परत आली नाहीं.

नदीचें पात्र कोणत्या कारणामुळें वर उचललें जातें किंवा बदलतें हा निराळाच शास्त्रीय विषय आहे. केवळ एकाच कारणामुळें नेहमीं भू-पृष्ठामध्यें फरक होत नसतात. थोडक्यांत व सोप्या भाषेंत सांगावयाचें तर असें म्हणतां येईल कीं, पाऊस जों जों कमी होतो तेव्हां नदीचें पात्र वाळूनें भरलें जातें व नदी मंद गतीनें वहाते. कित्येक वर्षें अशा तऱ्हेनें गेलीं म्हणजे नदीचा तळ हा खूप वर येतो. ह्यानंतर हवामानांत फरक झाल्यामुळें किंवा अन्य कारणानें नदीचें पात्र बदलतें. पावसाचें प्रमाण वाढलें तर पाण्याच्या वेगानें पात्र खोल जातें. असाच प्रकार महाराष्ट्रांत नाशिक, गंगापूर, संगमनेर या ठिकाणां-जवळ आपणांस पाहावयास मिळतो.

नाशिक व त्याच्या आसपास जें संशोधन झालें त्यामध्यें मिळालेल्या माहितीवरून एक 'वेळापत्रक'* तयार केलें आहे. त्यावरून महाराष्ट्रांत मानव-संस्कृतीचा प्रारंभ व विकास कसा झाला हें समजून येईल. ह्या पत्रकांत फेरफार कदाचित् करावेहि लागतील. परंतु त्यांतील सर्वसाधारण सिद्धांत कायमच राहतील.

---

* महाराष्ट्रांतील संस्कृतीचें 'वेळापत्रक'

| युग | स्थळ | काळ |
|---|---|---|
| १ आदिपाषाणयुग | | |
| मानवांनीं बनविलेलीं दगडांचीं हत्यारें | गंगावाडी, नाशिक | इ. स. पूर्वीं सुमारें ५ लक्ष ते ३० लक्ष वर्षें |
| २ मध्यपाषाणयुग | | |
| मानवांनीं बनविलेलीं दगडांचीं लहान हत्यारें | नान्दुर, मध्मेश्वर, निफाड, नाशिक | इ. स. पूर्वीं सुमारें पांच हजार ते दहा हजार वर्षें |
| ३ ताम्रपाषाणयुग | | |
| दगडाचीं लहान हत्यारें, तांब्याच्या कुऱ्हाडीचीं पातीं, बांगड्या आणि रंगीत सचित्र मातीचीं भांडीं | जोर्वे, नाशिक | इसवी सनापूर्वीं सुमारें १५०० वर्षें |
| ४ ऐतिहासिक काळ | | |
| काळीं, गुळगुळीत आणि चकचकीत ( अशोकाच्या वेळचीं ) खापरें. | नाशिक | इ. स. पूर्व ५०० ते इ. स. पूर्व १०० |
| रोमन 'रूलेटेड्'( rouletted ) आणि ॲरेटाईन खापरें, शातवाहनाच्या काळचीं घरें, मातीचीं भांडीं इत्यादि. | नाशिक, कोल्हापूर | इ. स. पूर्व १०० ते इ. स. १०० |







प्रा. भा. शं. भणगे

# केशवसुतांपासून मुक्तिबोधांपर्यंत—

आधुनिक मराठी कवितेची सुरुवात केशवसुतांपासून झाली हें निर्विवाद होय. १८८५ ते १९०५ हा केशवसुतांचा लेखनकाळ होय. त्याच काळांत आणि नंतरचीं पंधरा वर्षें रे० टिळक, गोविंदाग्रज, बालकवि ठोंबरे आणि विनायक हे कवी पुढें आले. ह्या पांच कवींना श्री. माडखोलकर यांनीं 'आधुनिक कविपंचक' अशी संज्ञा दिली आहे. ह्या कालखंडास 'आधुनिक कविपंचकां'चा कालखंड असें म्हणतां येईल. त्यानंतर १९२३ सालीं 'रविकिरण-मंडळा'ची स्थापना झाली. 'मंडळां'तील यशवन्त आणि गिरीश ह्या कवींनीं खूप लोकप्रियता संपादिली. दुसरें महायुद्ध सुरू होईपर्यंतच्या कालखंडास 'रविकिरण-मंडळा'चा कालखंड असें म्हणतां येईल. दुसऱ्या महायुद्धाच्या काळांत आणि नंतर मर्ढेकर—भावे—करंदीकर—मुक्तिबोध ह्यांनीं नव्या प्रकारची कविता लिहिली. ह्या कालखंडास 'नवकविते'चा कालखंड म्हणतां येईल. आधुनिक कवितेच्या ह्या तीन कालखंडांत कवितेंत कोणते विचारप्रवाह खेळत होते, तें पाहणें उद्‌बोधक ठरेल. कवितेमागें विचारधारा असते, कवीच्या विचाराचा सामाजिक संदर्भ लावतां येतो आणि कवितेच्या समीक्षेंत विचारांची समीक्षा महत्त्वाची असते, असें येथें गृहीत मानलें आहे.

'आधुनिक कविपंचकां'तील आद्य केशवसुत. केशवसुतांची कविता सुधारणावादी आहे असें ढोबळ मानानें समजलें जातें. परंतु ती सुधारणावादी नसून सौंदर्यवादी ( रोमँटिक ) आहे, असेंहि कांहीं टीकाकार म्हणूं लागले आहेत. केशवसुत सौंदर्यवादी होते हें एका विशिष्ट पण मर्यादित अर्थानें खरेंहि आहे. सौंदर्यवादी कविता ज्या विशिष्ट सामाजिक अवस्थेंत निर्माण होते तीच सामाजिक अवस्था केशवसुतांभोंवतीं होती. सौंदर्यवादी कवितेमागें जी मूलप्रेरणा असते तीच केशवसुतांच्या कवितेमागें होती.

## सौंदर्यवादी काव्य

मानवी इतिहास हा व्यक्तिविमोचनाचा, व्यक्तिविकासाचा इतिहास होय. व्यक्ति ह्या कल्पनेंत तिच्या आत्मिक आणि भौतिक अशा सर्वांगीण अस्तित्वाचें साकल्य अभिप्रेत आहे. सामाजिक आणि राजकीय, आर्थिक आणि नैतिक या बाबतींत व्यक्ति स्वतंत्र कशी होईल याचा शोध करीत असतांनाच शास्त्रें, कला, तत्त्वज्ञानें, इतिहास निर्माण करतात. सर्व श्रेष्ठ वाङ्‌मयांत ही व्यक्तिविमुक्तीचीच प्रेरणा अनुस्यूत असते.

सरंजामी समाजांत व्यक्ति सर्व बाजूंनीं बंधनांत जखडलेली होती. बहुजनसमाज भूदासांचा बनला होता. आर्थिक दारिद्य आणि पिळवणूक यांनीं तो गांजला होता. सामाजिक परंपरेनें आणि धार्मिक समजुतींनीं त्याला दास्यांत जखडलें होतें. समता नव्हती, बंधुता नव्हती, कीं न्याय नव्हता ! मग ज्ञानाचा प्रसार होऊं लागला. नवा व्यापारी वर्ग समाजांत निर्माण होऊं लागला. बंधनांत जखडलेलें 'व्यक्तित्व' बंड करून उठलें. पुढें नवा भांडवलशाहीचा समाज दिसूं लागला. नव्या समाजांत व्यक्ति मुक्त झाली. तिला आर्थिक व धार्मिक स्वातंत्र्य मिळालें; तिच्यावरील परंपरेचें दास्य नष्ट झालें. 'व्यक्ति'त्वानें त्या स्वातंत्र्याचें ईर्ष्येनें स्वागत केलें. नवा भांडवलशाही समाज रूढ झाला म्हणजे








'व्यक्ति'त्व विकास पावूं लागतें. सरंजामशाहीच्या अंतकाळांत आणि भांडवलशाहीच्या प्रथमकाळांत व्यक्तिविमोचनाला, व्यक्तिविकासाला पोषक असें तत्त्वज्ञान निर्माण होतें.

व्यक्तिविमुक्तीच्या तत्त्वज्ञानांत व्यक्तीचें प्राथम्य प्रस्थापित करावें लागतें. व्यक्तिविमुक्तीविषयींची प्रतिक्रिया दोन प्रकारची असते. ह्या दोन्ही इंद्रधनुष्याच्या वर्णांप्रमाणें एकत्र मिसळतात. पण त्या वेगवेगळ्या आहेत ह्यांत शंका नाहीं. कोणत्याहि एका काळांत एक प्रतिक्रिया कमी, तर दुसरी जास्त असें प्रमाण दिसतें. पहिली प्रतिक्रिया भावनेची, दुसरी बुद्धीची. भावनेच्या प्रतिक्रियेंत व्यक्ति ही जन्मतःच मुक्त आहे; निसर्गतःच स्वयंविकासशील आहे. व्यक्तींत सर्व चांगले गुण एकवटलेले आहेत, तिच्यामध्यें जसें कांहीं देवत्व आहे असें मानलें जातें. व्यक्ति आणि भोंवताल यांविषयीं अतीव विस्मय बाळगला जातो. विस्मयपूर्ण आणि भावनोद्‌भूत अशी ही व्यक्तिविकासाची प्रतिक्रिया काव्यांत सौंदर्यवादाचें रूप धारण करते. ह्या सौंदर्यवादी काव्यांत व्यक्तीचें महत्त्व मूळ मानून त्यावर तिच्या सुखदुःखांचीं, आशा-आकांक्षांचीं चित्रें रंगविलेलीं असतात. समाजनिर्मित कोणतींहि बंधनें कृत्रिम आणि व्यक्तीला मारक समजून, तीं बंधनें अजून ज्याला बाधलीं नाहींत, अशा बालकाचीं स्तोत्रें गायिलीं जातात. निसर्गाचें स्तवन होऊं लागतें. मग तो निसर्ग म्हणजे संध्याकालीन मेघ असतील, वनश्री असेल, डोह किंवा निर्झर असेल, फटींत उगवणारीं फुलें किंवा रानफुलें असतील किंवा समाजनियमनापासून विमुक्त असे पक्ष्यांसारखे प्राणिमात्र असतील. नागरजीवनापासून दूर अशा अकृत्रिम निसर्गाच्या सांगातीं वावरत असल्यामुळें ज्याला अधिक स्वातंत्र्य आहे, अशा ग्रामीण कृषीवलाचीं आणि कृषीवलकन्येचीं मुलायम चित्रें काढलीं जातात. तत्त्वचिंतनाकडे ओढ असते. कल्पनेचीं नगरें वसविलीं जातात. ही कविता जीवनांत सौंदर्य शोधायला लावते, जीवनावर प्रेम करायला लावते.

सौन्दर्यवादी कविता जशी सामाजिक अवस्थेनुरूप निर्माण होते आणि फोफावते, तशी ती पुढें ओहोटीलाहि लागते. शास्त्राच्या प्रगतीबरोबर विस्मय क्षय पावतो आणि मानवाच्या बुद्धीवर विश्वास बसतो. व्यक्तीचें प्राथम्य भावनोद्‌भूत प्रतिक्रियेंतून निर्माण होण्याऐवजीं मानवाच्या बुद्धीची करामत पाहून तें पटूं लागतें. मानवाचें प्राथम्य भावनेनें सिद्ध करण्यापेक्षां बुद्धीवरून सिद्ध करणें अधिक सुरक्षित ठरतें. ही व्यक्तिविमुक्तीची मागें उल्लेखिलेली दुसरी प्रतिक्रिया होय. प्रत्येक गोष्टीकडे कार्यकारणभावाच्या दृष्टीनें पाहून तिचें स्पष्टीकरण करण्यांत येतें. विस्मयांतून निर्माण झालेलें सौन्दर्य नष्ट होतें. शास्त्रानें काव्य मारलें ही तक्रार उद्‌भवते ती अशी. तक्रार करतांना भव्य म्हणजे सौन्दर्यवादी काव्य, एवढेंच मात्र अभिप्रेत असतें.

सरंजामशाहीपेक्षां भांडवलशाहींत व्यक्तिविमोचन अधिक झालें ह्यांत शंका नाहीं. पण ही भांडवलशाहीच व्यक्तिविकासाला मारक झाली आहे असें दिसून येतें. भांडवलशाहीच्या सुरुवातीला ती ज्या अपेक्षा निर्माण करते त्या ती पुऱ्या करीत नाहीं. भांडवलशाहीनें आणलेली दुःखपरंपरा आतां दिसूं लागते. केवळ भावनेच्या प्रतिक्रियेंतून ज्यांनीं तिचें स्वागत केलेलें असतें ते कवी निराश होतात. सामाजिक परिस्थितीवर जोरदार टीका होऊं लागते. बुद्धिवादी लोक सामाजिक परिस्थितीच्या दोषांचें मूळ शोधूं पाहतात. ज्या समाजरचनेचा डोळस विचार टाळून सौन्दर्यवादी कवी कल्पनेचीं नगरें वसवीत असतात, ती स्वतःची जाणीव करून देते. सुधारणेची मागणी होते, प्रयत्न होतात. काव्यहि सुधारणावादी बनतें.

### केशवसुतांची कविता

ह्या पार्श्वभूमीवर केशवसुतांची कविता सौंदर्यवादी होती कीं सुधारणावादी होती तें पाहिलें पाहिजे. इंग्रजी राजवटीनें नवें तत्त्वज्ञान आणि नवी समाजपद्धति आणली होती. तें नवें तत्त्वज्ञान होतें व्यक्तिविमोचनाचें, व्यक्तिस्वातंत्र्याचें आणि नवी समाजपद्धति होती भांडवलशाहीची. तें नवें तत्त्वज्ञान आंग्ल वाङ्मय शिकलेल्या लोकांस परिचित झालें होतें. भाऊ महाजन, लोकहितवादी, ज्योतीराव फुले, विष्णुशास्त्री पंडित, आगरकर ह्यांच्याप्रमाणें केशवसुतांना तें तत्त्वज्ञान पटलें होतें. जुनी भारतीय समाजपद्धति








आणि आंग्ल राज्यकर्त्यांनीं आणलेली नवीन समाज-पद्धति ह्यांतील विरोधहि त्यांना स्पष्ट दिसत होता. एक सरंजामशाही होती तर दुसरी भांडवलशाही होती. पहिली मागसलेली होती. अज्ञान, अंध समजुती, परंपराप्रियता हें तिचें सामर्थ्य होतें. दारिद्र्य, सामाजिक विषमता आणि दंभ ही तिची देणगी होती. व्यक्तीच्या विकासाला वाव नव्हता. त्यामुळें केशवसुतांनीं व्यक्तिविकासाला संधि देणाऱ्या नव्या समाजपद्धतीचें स्वागत केलें. "निराशेनें निष्प्राण झालेल्या अभागी महाराष्ट्राचे करुणारव कानीं पडल्यामुळें दचकलेल्या, द्रवलेल्या, दुःखित झालेल्या केशवसुतांच्या प्रतिभेनें 'तुतारी' फुंकली! नवीन विचारांची छाया तुतारीच्या कवनावर अतोनात पडली होती."—(माडखोलकर).

> 'नियमन मनुजासाठीं, मानव
> नसे नियमनासाठीं, जाणा,
> प्रगतिस जरि तें हाणी टोणा
> झुगारुनि तें देउनि, बाणा
> मिरवा निज ओजाचा अभिनव !'

अशी त्यांनीं घोषणा केली.

केशवसुतांमागील प्रेरणा व्यक्तिविमोचनाचीच असल्यामुळें आणि परिस्थितीहि भांडवलशाहीच्या स्वागताची असल्यामुळें, सौंदर्यवादी कवींप्रमाणें त्यांनीं कांहीं कविता लिहिली. त्यांनीं साध्याहि विषयांत मोठा आशय पाहिला. बाल्यावर प्रेम केलें, प्रेमाचा महिमा गायिला, सृष्टीवर कविता केली, गूढ-गुंजनहि केलें. पण केशवसुतांना पूर्णतया सौंदर्यवादी म्हणणें बरोबर नाहीं. सौंदर्यवादी कवींच्या व्यक्ति-विकासाच्या प्रतिक्रियेंत विस्मय आणि भावनोद्भव हीं असतात, तीं केशवसुतांत असणें शक्य नव्हतें. केशवसुत ज्या काळांत लिहीत होते, त्या काळांत आंग्लकवितेंत सौंदर्यवादाचा ऱ्हास होत होता. व्यक्तीचें माहात्म्य बुद्धिवादाच्या आधारें सांगितलें जात होतें. इंग्लंडांत राजकीय आणि आर्थिक सुधारणा केल्या जात होत्या. मिल् आणि स्पेन्सर ह्यांचा, बुद्धिवादाचा तो काळ होता. महाराष्ट्रांत आगरकरांनीं मिल्-स्पेन्सरचा व्यक्तिवाद सांगण्यास सुरुवात केली होती. केशवसुतांचा व्यक्तिवाद हा सुधारणावाद असणेंच अधिक साहजिक होतें. त्यामुळें त्यांनीं दंभावर, सामाजिक विषमतेवर आणि अंध-श्रद्धेवर कोरडे ओढण्यास सुरुवात केली. व्यक्ति-वादाचा आविष्कार सौंदर्यवादांतून आणि सुधारणा-वादांतून होत असला, तरी केशवसुतांचा भर विशेषतः सुधारणावादावरच होता. त्यांच्या बाबतींत सौंदर्यवाद गौण समजला पाहिजे.

## 'कविपंचकां'तील इतर चार कवी

'कविपंचकां'तील इतर चार कवींनीं मात्र केशवसुतांमधील ही सौंदर्यवादाची गौण धारा उचलली आणि विशेष वाढविली. 'काव्यविहारी' हेच केशवसुतांचे निष्ठावन्त चेले दिसतात. पण पहिल्या दर्जाच्या कवींमध्यें त्यांची गणना झाली नाहीं; त्यांना कविपंचकांत स्थान नाहीं. रे० टिळकांनीं लिहिलें: "केशवसुत करि गानातें। आम्ही गातों सांगातें." त्यांच्या 'रणशिंग', 'बोंबाबोंब', 'ब्राह्मण आणि महार' इत्यादि कविता केशवसुतांचा सुधारणावाद सुचवितात. "पण, केशवसुतांचा टिळकांच्या मनावरील पगडा फार वेळ टिकला नाहीं. कारण, टिळकांची मनोवृत्ति केशवसुतांच्या मनासारखी बंडखोर केव्हांच नव्हती. म्हणूनच टिळकांच्या वरील कविता म्हणजे केशवसुतांच्या विचारांचे उमटलेले अस्फुट पडसाद वाटतात." ('अर्वाचीन मराठी वाङ्मयसेवक', भाग १, पा. ३०६). टिळक 'फुलामुलांचे कवि' बनले. त्यांच्या कवितेंत "दोन प्रकारचे गुण आहेत"—प्रसाद आणि प्रेमळपणा—असें न. चिं. केळकरांनीं थोडक्यांत सांगून टाकलें. केशवसुतांची जहाल सामाजिक दृष्टि टिळकांपाशीं नाहीं.

गोविंदाग्रज आणि बालकवि केशवसुतांपासून आणखी दूर गेले, अधिक सौंदर्यवादी बनले. गोविंदाग्रजांनीं अभिमानानें स्वतःला केशवसुतांचा 'सच्चा चेला' म्हणवून घेतलें. केशवसुतांच्या शिष्यत्वाच्या जाणिवेनें त्यांनीं 'दसरा' कविता लिहिली. "पण राष्ट्रीय, सामाजिक अगर तत्त्व-ज्ञानपर कविता या काव्यविभागांची हवा गडकऱ्यां-च्या प्रतिभेला फारशी मानवणारी नव्हती...त्यांच्या चांगल्या कवितांचा मुख्य भाग प्रेमगीतांनीं भरला आहे." ('अर्वाचीन मराठी साहित्यसेवक', भाग १, पा. २०४, २०५). अगदीं अलीकडील एक

टीकाकार लिहितो : " हा केशवसुतांचा चेला असलाच तरी कच्चा होता, असें अनेक टीकाकारांस वाटतें. एका दृष्टीनें हा चेला गुरूच्या मुळावर आला. १९२० सालच्या सुमारास केशवसुतांबाबत महाराष्ट्रास जाग येऊं लागली होती व पूर्वीच्या अनास्थेची फेड तो करील अशी आशा वाटत होती; तोंच गोविंदाग्रजांच्या विलक्षण लोकप्रियतेनें ती आशा मावळली. गोविंदाग्रजांच्या झळाळीपुढें केशवसुतांचें काव्य क्षणभर फिकें आणि ओबडधोबड वाटूं लागलें. "–( मं. वि. राजाध्यक्ष, 'पांच कवी', पा. १३४ ). 'गुलाबी कोडें' सोडविणारे गोविंदाग्रज 'प्रेमाचे शाहीर' म्हणून गाजले.

गोविंदाग्रजांना 'प्रेमाचे शाहीर' ही पदवी मिळाली, तर कवि माधवांनीं बालकवीला 'हा सृष्टीचा शाहीर' अशी पदवी दिली. 'अरुण', 'संध्यारजनी', 'फुलराणी', 'निर्झरास' ह्याच बालकवींच्या अत्युत्कृष्ट कविता होत. 'सृष्टि मला हांसविते। स्वर्गसौख्य दाखविते ।। शान्तीनें पालविते। आनंदे डोलविते ।। मन माझें टाकि गडे नित्य गुंगुनी' असें त्यांचें सृष्टिप्रेम होतें. 'सुंदरतेच्या सुमनावरलें दंव चुंबुनि घ्यावें। चैतन्याच्या गोड कोंवळ्या उन्हांत हिंडावें ।। प्रीतिसारिका गीत तियेचें ऐकावें कानीं ।।' ही त्यांची मनीषा होती. समाजाच्या दोषांचें त्यांना काय होय? त्यांनीं स्पष्टच सांगितलें : 'दोष असती जगतांत, असायाचे। मला त्यांशीं तरि काय करायाचें ?' केशवसुतांच्या 'तुतारी'च्या वळणावर बालकवींनीं 'धर्मवीर' ही कविता लिहिली तेवढीच. 'केशवसुतांची कविता अधिक विचारशील आहे; बालकवींची कविता मुख्यतः सौंदर्यरत आहे हेंच खरें.' (राजाध्यक्ष, पान १६९). 'या पांच कवींत सामाजिक अन्यायाच्या निषेधाचें काव्य न लिहिणारा एकटा विनायक'. ( राजाध्यक्ष, पा. १०७). तो इतिहासांत झिंगत राहिला ! " पूर्व दिव्य ज्यांचें, त्यांना रम्य भाविकाळ। बोध हाच इतिहासाचा गमे सर्व काळ ।। " अशी त्यांची श्रद्धा होती.

## 'रविकिरण-मंडळा'चें काव्य

केशवसुतांचा संप्रदाय मा. त्रिं. पटवर्धनांना महत्त्वाचा वाटत नाहीं. सकृद्दर्शनीं हें विधान चमत्कारिक वाटेल, पण सत्य याहिपेक्षां कटु आहे. केशवसुतांचा संप्रदाय येथें झालाच नाहीं. जेथें 'कविपंचकां'तील इतर चार कवींनीं केशवसुतांची सामाजिक दृष्टि स्वीकारली नाहीं तेथें 'रविकिरण-मंडळा'च्या कवींविषयीं विचारावयासच नको ! केशवसुतांऐवजीं 'कविपंचकां'तील इतर चार कवींचा मात्र नवा संप्रदाय झाला. 'निघतील तयांचे चेले। केशवसुत कसले मेले। केशवसुत गातचि बसले।' हें खोटें ठरलें. 'रविकिरण-मंडळाची कविता ही त्या चार कवींच्या काव्याचें अधिक निर्मळ स्वरूप होय. सौन्दर्यवादी कवितेंत असतें त्याप्रमाणें या कवितेंतील 'व्यक्तित्व' विलक्षण बंडखोर होतें. पण हा बंडखोरपणा फक्त प्रेम आणि विवाह ह्या विषयांच्या बंधनांतच अडकून राहिला. 'रविकिरण-मंडळा'नें 'किरण' नांवाचें पहिलें कवितेचें पुस्तक १९२३ सालीं प्रसिद्ध केलें. त्या पुस्तकावर एक ज्येष्ठ टीकाकार बा. अ. भिडे ह्यांनीं टीका केली ती अशी : " हीं सर्वच कवनें अत्यंत मोहक उतरलीं आहेत. त्यांचें रचनाचातुर्य, श्रवणमाधुर्य, भावनातरलत्व, कल्पनाकौशल्य व विकारोन्माद कोणाहि तरुणाच्या अंतःकरणास भारून टाकल्यावांचून रहाणार नाहीं. पण या शृंगारिक कवनांचें भयंकरत्व काव्यप्रतिभेच्या दीप्तीनें दुणावलें आहे. चावणाऱ्या विषारी दांतांच्या अगर कापणाऱ्या तीव्र शस्त्राच्या सुभगाकाराचें, तेजस्वी पाण्याचें किंवा कुशाग्रतेचें कौतुक आम्ही कोणत्या तोंडानें करावें ? कवंडळाची कान्ति, वेश्येचें लावण्य, मदिरेचा सुवास, विषाचें माधुर्य, शठांचें साधुत्व व प्रस्तुत कवनांचें प्रतिभासंपन्नत्व हीं परिणामीं सारखींच घातक होणारीं आहेत. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभाच्या सुमारास रावबाजींच्या चैनबाजींत उद्भवलेल्या अनंतफंदी, परशराम, होनाजी बाळ, प्रभाकर इत्यादि वागीश्वरांचे सुधारलेले अवतार विसाव्या शतकाच्या आरंभीं पुन्हां होणार, अशीं दुश्चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं आहेत. पुढील छकडा-लावण्यांच्या उदयाचा हा अरुणकिरण आहे, असें म्हटलें तरी चालेल." आजच्या वाचकाला श्री. भिडे ह्यांच्या टीकेंतील

अतिशयोक्ति सहज कळून येईल. अतिशयोक्ति दूर केली, तरी टीकेंतील एवढें सत्य मान्य केलें पाहिजे कीं, ' रविकिरण-मंडळा 'ची कविता ही विशेषतः प्रेमकविता आणि सामान्यतः कल्पनारम्यतेची कविता होती.

' रविकिरण-मंडळा 'चे कवी सुविद्य आणि सुधारक होते. भौतिक परिस्थितींत आणि कल्पनांत सुधारणा व्हायला हवी, ह्याची जाणीव त्यांना होती. उदाहरणार्थ, माधवराव पटवर्धनांनीं त्यांच्या'सुधारक' या खंडकाव्याच्या प्रस्तावनेंत लिहिलें आहे : " केशवसुतांनीं ' तुतारीं'त व गोविंदाग्रजांनीं ' स्मशानगीतां 'त सामाजिक अन्यायांवर ज्या प्रकारची टीका केली आहे, तशाच प्रकारची टीका ' सुधारक ' काव्यांत निरनिराळ्या सामाजिक प्रश्नांवर व कल्पनांवर केलेली आहे. " पण पुढें ते स्वतःच लिहितात : " प्रस्तुत काव्यांत प्रेम आणि विवाह यांच्या निरनिराळ्या बाजू दाखविण्याचा प्रयत्न आहे. "स्वतःच्या सुधारणावादाची आकुंचित मर्यादा स्वतः कवीनेंच मान्य केली हें बरें ! माधवराव पटवर्धनांची काव्यशक्ति त्यांच्या ' विरहतरंग ' ह्या निर्भेळ प्रेमकाव्यांतच विशेष रंगली असें दिसतें. एका आधुनिक टीकाकारानें ' विरहतरंग ' हें काव्य कालिदासाच्या ' मेघदूता 'पेक्षां सरस मानलें तें उगीच नव्हे. यशवंतांचें ' बंदिशाळा ' हें खंडकाव्य त्यांच्या सुधारणावादाचें चिन्ह नव्हे. तें काव्य त्यांनीं कां लिहिलें ह्याबद्दल त्यांनीं पुस्तकाच्या प्रस्तावनेंत स्पष्टीकरण दिलें आहे. रेफमेंटरी स्कूलमध्यें येणाऱ्या मुलांची दुःस्थिति पाहून त्यांनीं तें काव्य लिहिलें. त्यांत त्यांनीं सामाजिक विषमतेवर, दंभावर टीका केली, तरी त्यांच्यापाशीं सामाजिक सुधारणेची सुसंगत आणि सर्वस्पर्शी अशी दृष्टि होती, असें कोठेंच दिसत नाहीं.

### केशवसुतांची विस्मृति

केशवसुतानंतरच्या सगळ्या काव्याचें स्वरूप असें आहे. सफळ, निष्फळ प्रेमाच्या कवितांना ऊत आला. इतिहासाचे गोडवे गायले गेले. फुटकी तपेली, मोडकी खाट वगैरे सामान्य गोष्टीसुद्धां कवितेचे विषय ठरले. फुलामुलांचे, समुद्र-चंद्र-चांदण्यांचे, जानपद जीवनाचे, त्यागाचे, पावित्र्याचे आणि क्रांति-बंडखोरीचेहि संकेत ठाण मांडून बसले. कल्पनेचे पंख विस्तरले. ' मी ' आणि ' तूं ' ची व्याकरणांतील सर्व रूपें वापरून भावगीतें तयार झालीं. ठरीव सांच्याची राष्ट्रीय कविता मधून मधून डोकावली. ही कविता गेय होती. किंबहुना ' रविकिरण-मंडळाच्या ' कांहीं कवींनीं काव्यगायनाचाहि पायंडा पाडला. तांत्रिक साफसुफी आणि कलाकुसर भरपूर झाली. कविता लोकप्रिय झाली हें केशवसुतांनंतरच्या सर्व कवींना, विशेषतः ' रविकिरण-मंडळा'च्या कवींना मोठें श्रेय आहे. पण ह्या कवितेंत सामाजिक दृष्टि अंतर्भूत नाहीं असेंच म्हटलें पाहिजे. केशवसुतांना आद्यकवि म्हणणारें मराठी काव्य केशवसुतांना विसरलें. पहिल्या मध्यभारतीय कविसंमेलनाच्या अध्यक्षपदावरून कवि भास्करराव तांबे यांनीं केशवसुतांच्या ' दासवृत्ती 'चा उल्लेख केला. कांहीं तथाकथित ' महाकवी ' केशवसुतांवर तोंडसुखसुद्धां घेऊं लागले आणि श्री. वर्तकांना त्यांना उत्तर देणें भाग पडलें. राष्ट्रीय आंदोलनें झालीं, एवढी मोठी मंदीची लाट येऊन गेली, पण आमच्या कवींस त्याचें काय होय ? यशवंतासारख्या एकाद्या कवीचा सूर निराशेचा असायचा, तरी तो प्रेमाचीच कथा सांगायचा. मध्येंच कोठें तरी परिस्थितीचें जूं मानेवर बसलें आहे, पाठीवर आसूड बसतो आहे, परिस्थिति नाकांत वेसण घालून अस्वलासारखी दारोदार फिरवते आहे, आकांक्षांना तडे जात आहेत, मनोमय मूर्ति निर्माण होत नाहीं, कोणा गरिबाचा पोर खाटेवर मृत्यूच्या दारांत पडला आहे असे सूर ऐकूं येत. पण सगळ्या जीवनमूल्यांविषयीं आणि भौतिक परिस्थिती-संबंधीं फेरविचार करायला लावील, असें त्यांच्या काव्यांत कांहींच नाहीं. ज्या जीवनाविषयीं आणि जीवनांतल्या साध्या विषयाविषयीं, भावभावना-विषयीं ते प्रेम निर्माण करीत होते, त्यांतील सौंदर्य दाखवीत होते त्या जीवनाची बैठकच खचत होती. हें त्या कवींनीं ओळखलें नाहीं. " कांहीं थोडे अपवादात्मक लेखक वगळले, तर सन १९२० सालानंतरचें वाङ्मय म्हणजे आमच्या बौद्धिक जीवनांतील वास्तवता आणि कलाविपर्यासाची एक










अत्यंत रोगट अशी वाढ होय.''–(पु. य. देशपांडे, 'साहित्य आणि समाजजीवन ', पृ. ७५ ).

पहिल्या महायुद्धानंतर आंग्ल कवितेंत महत्त्वाचीं स्थित्यंतरें झालीं. भांडवलशाहीनें महायुद्धाचें अरिष्ट ओढवून घेतलें होतें. 'न भूतो' अशा प्रकारचा मानवी संहार झाला होता. नंतरच्या शांतताकाळांत तरी त्याचा फायदा व्हावयाचा तोहि झाला नाहीं. युद्ध निष्फळ तर शांतताहि निष्फळ ठरली. ए. सी. वॉर्ड ह्या टीकाकारानें 'The Nineteen Twenties' ह्या ग्रंथांत त्या वेळच्या परिस्थितीचा आणि वाङ्मयाचा आढावा घेतला आहे. तो म्हणतो कीं, त्या दहा वर्षांत एक ' रक्तहीन युद्ध ' (bloodless war ) आणि एक ' निःशब्द क्रान्ति ' ( silent revolution ) झालीं; युद्ध समाधानी ( Contents ) आणि असमाधानी ( Not-contents ) ह्यांमध्यें झालें. कॉन्स्टन्टाइननें ख्रिस्ती धर्म स्वीकारल्यापासून एवढी मोठी 'क्रान्ति' झाली नव्हती असें त्याचें म्हणणें आहे. ह्या ' क्रांती 'नें माणसें अश्रद्ध बनलीं. हा केवळ युद्धाचा परिणाम म्हणणें चुकीचें आहे. सबंध भांडवलशाही संस्कृती-विषयींच अविश्वास, उबग निर्माण झाली. यंत्रानें मानवावर आक्रमण केलें, मानवाला स्वतंत्र अस्तित्व ठेवलें नाहीं. मानव यांत्रिक युगांत उपकरणमात्र झाला आहे, अशी भावना जोरानें पसरूं लागली. समाजामध्यें वैफल्याची जाणीव जेथेंतेथें दिसूं लागली. मंदीची लाट आल्यावर त्या भावनेचा तर प्रकर्ष झाला.

We that are children of despair...
How all hope's vain, all effort null...
Frightened yet moulded
by the cold hard patterns
Beaten upon life
by the loud machines—
What do we know of love ?

—( रिचर्ड आल्डिंग्टनः 'The Eaten Heart') असें कवि म्हणूं लागले. टी. एस्. ईलिअटनें समाजाला असल्याच विचारांनीं हादरे दिले. त्याच्या ' Waste Land ' ह्या कवितेंत हीच निराशेची भावना भरली आहे. ' Hollow Men ' ह्या कवितेंत ईलिअट माणसांचें वर्णन करतो :

Shape without form, shade without colour,
Paralysed force, gesture without motion.

वरील कवितेचा शेवट असा आहे :

This is the way the world ends
Not with a bang, but with a whimper.

ह्या युगांतील माणसें ऊर बडवून आक्रोश करीत नाहींत. तीं स्वतःशीं कुढत, मुसमुसत, चोरून हुंदके देत, हळूहळू मरतात ! कारण त्यांना संधि मिळत नाहीं, त्यांचा विकास होत नाहीं. त्यांना आशा दिसत नाहीं.

आमच्या मराठी कवीला जीवन एवढें वैराण वाटणार नाहीं, विफलतेची जाणीव एवढ्या तीव्रतेनें होणार नाहीं. कारण त्याला पहिल्या महायुद्धाच्या ज्वाळा फार लागल्या नाहींत, भांडवलशाहीची दिवाळखोरी पटण्याइतका भांडवलशाहीचा व्याप येथें वाढला नाहीं. शिवाय भांडवलशाहीचे दोष पारतंत्र्यास चिकटविण्याची पायघोळ सोयहि ह्या देशांत होती ! पण विग्रह ह्याहि देशांत होता आणि तो सारखा वाढत होता, ह्यांत शंका नाहीं. कवि तांबे 'आम्ही कवि एकाच काळाचे प्रतिनिधि नसून त्रिकालाचे प्रतिनिधि आहोंत ' असें सांगतात. पण ह्या कवींना केवळ ह्या देशांतच नव्हे तर, सबंध सद्यःकालीन संस्कृतीला हादरे कसे बसतात हें कळूं नये ह्याचें आश्चर्य वाटतें !

### अपवादात्मक नवी जाणीव

अपवाद होते अनंत काणेकर, अत्रे आणि अनिल. त्यांना मराठी कवितेचा दोष जाणवला. काणेकरांच्या ' चांदरात 'च्या प्रस्तावनेंत के. नारायण काळे ह्यांनीं लिहिलें : " १९३१ ते ३२ या सालीं त्यांनीं ( काणेकरांनीं ) ' कवनें ' व ' दोन देवभक्त ' या ज्या दोनच कविता लिहिल्या आहेत, त्यांवरून श्री. काणेकरांचें ' हृदयपांखरूं ' आज शतकानुशतकें गृहीत धरल्या गेलेल्या काव्यविषयक







कल्पनांच्या पिंजऱ्यांतून बाहेर बेफाम पंख पसरण्याची धडपड करीत आहे असें दिसतें. या दोन कवितांनीं श्री. काणेकरांनीं मराठी काव्यक्षेत्रांतील नव्या मनूच्या पहिल्या पताका फडकवल्या असून, यापुढील त्यांचीच काय पण इतर नवोदित तरुण कवींची काव्यरचनाहि त्याच वळणावर जाईल असें वाटतें." (पान १०). शेतकरी धान्य पिकवतो पण त्याचीं पोरें उपाशी मरतात. तें धान्य खाऊन श्रीमंत लोक प्रियेचा गोंडस हात हातांत घेऊन फिरताहेत. कवि त्यांचीं कवनें मात्र गातो! विलासी लोकांचा प्रणय कवि रंगवतो. शंभरांतील नव्वद जनतेला 'घर' नाहीं. कामकऱ्याच्या पोटांत पडलेल्या आगीकडे दुर्लक्ष करून खुशालचेंडूंच्या हृदयांत जी प्रेमभंगानें आग पडते त्यावर कवि कविता रचतो आहे! म्हणून काणेकरांनीं लिहिलें :

"नक्षत्रांचीं, फुलांफळांचीं
कृष्णसख्याच्या व्यभिचारांचीं,
आणिक झुरत्या युवयुवतींचीं
खूप जाहलीं हीं रडगाणीं!
धनी जनांशीं झुंज खेळुनी
क्षणभर ज्यांना आली ग्लानी,
त्यांना आम्ही गाऊं गाणीं,
ऐकुनि जीं चवताळुनि लढतिल
आणि स्थापितिल सत्ता अपुली"

"भौतिकवादी काव्यरचनेला मराठींतहि उज्ज्वल भविष्यकाल आहे, अशी न्याय्य अपेक्षा श्री. काणेकर यांनीं निर्माण केली" असें श्री. काळे म्हणतात. ही अपेक्षा अनाठायीं होती असें नंतर सिद्ध झालें. काणेकरांचें महाराष्ट्रानें कौतुक केलें तें असल्या कवितांसाठीं नसून "तूं माझी अन् तुझा मीच", "चल ग सजणे रानामध्यें, चाफ्याचं फुल तुझ्या कानामध्यें" लिहिण्याबद्दल आणि कोळ्यांचीं प्रेमगीतें लिहिण्याबद्दल!

आ. अत्रे यांनींहि पुढील विचार प्रकट केले: "ओरडणाऱ्या कोकिळेपेक्षां पोटांत कोकलणाऱ्या कावळ्यावर आज काव्य लिहिण्याची पाळी आली आहे. रात्रीच्या अंधारांत कुंपणावर चमकणाऱ्या काजव्यावर काव्य लिहिणें हें अधिक आवश्यक झालेलें आहे. आजच्या समाजाचें जीवन, त्याच्या धडपडी, त्याचीं दुःखें, त्याच्या आकांक्षा ज्यांत जिवंतपणें व्यक्त करतां येतील तें खरें काव्य आणि तें ज्या साधनांनीं उत्कृष्ट तऱ्हेनें व्यक्त करतां येईल तेंच काव्याचें तंत्र." ('गीतगंगा', पा. २४).

"एका सामाजिक तत्त्वज्ञानाच्या आधारावर बाह्य वास्तवतेमुळें निर्माण होणाऱ्या स्वतःच्या अनुभूतींचें व सामाजिक वास्तवतेचें विश्लेषणात्मक वस्तुनिष्ठ चिंतन कवि अनिलांच्या कवितेंतून पहिल्या प्रथम प्रकट झालें." (मुक्तिबोध, 'सत्यकथा', मार्च १९५०). 'सुप्त ज्वालामुखी' या कवितेंत अनिल लिहितात :

"अरे! जी स्थिति तुम्हीं निर्मिली
मुळांतच ती आहे चुकली
जेथें माणसा काम न मिळें
काम करतांहि पोटापुरतें मिळें न मोल
आहे तो समाज मतलब्यांचा,
परपुष्टांचा, नफेबाजांचा,
रक्तशोषक जळवांचाच."

कवि कान्त आणि कुसुमाग्रजांचाहि येथें उल्लेख केला पाहिजे. कुसुमाग्रजांना खांडेकरांनीं 'मानवतेचा कवि' असें सार्थ अभिधान दिलें : "विषमता, पिळवणूक, गांजणूक आणि अन्याय यांच्याविषयीं बहुजनसमाजाची चीड कुसुमाग्रजांनीं अत्यंत उत्कट आणि सुंदर स्वरूपांत आपल्या काव्यांतून व्यक्त केली आहे." ('विशाखा', पा. ६). उदा. 'बळी', 'लिलाव' ह्या त्यांच्या कविता पाहाव्या.

काणेकरादि कवींमध्यें नवी जाणीव निर्माण झाली आणि 'रविकिरण-मंडळा'चें काव्य ऱ्हासकालीन आहे असें दिसूं लागलें. पण नवी जाणीव झालेल्यांपैकीं काणेकर आणि अत्रे ह्यांनीं कविता लिहिण्याचेंच जवळ जवळ सोडून दिलें, हें मराठी काव्याचें दुर्दैव होय. काव्यापेक्षां गद्यच लिहिणें त्यांना सोयीचें वाटूं लागलें. नवें काव्य निर्माण होणारच नाहीं कीं काय, अशी शंका निर्माण झाली. काणेकर, अत्रे ह्यांना जी अडचण भासत होती ती नवविचारांच्या प्रकटीकरणाबद्दलची. जुन्या संकेतांत, जुन्या भाषेंत, जुन्या तंत्रांत नवी कविता लिहायची कशी? काणेकरांनीं 'चांदरात' च्या दुसऱ्या आवृत्तीच्या प्रस्तावनेंत (१९४०)










आपली अडचण व्यक्त केली आहे: " आजूबाजूच्या जगाकडे पाहिल्यानंतर ज्या वस्तुनिष्ठ भावना किंवा कल्पना माझ्या मनांत उत्पन्न होतात, त्या गद्यांतच मी चांगल्या तऱ्हेनें व्यक्त करूं शकेन, किंवा त्यांपैकीं ज्या काव्यांत व्यक्त करण्यासारख्या असतील, त्या व्यक्त करण्याचें नवीन माध्यम मला अजून सांपडत नसेल. पुढें मागें सांपडल्यास मी नवीन प्रकारचें काव्य लिहीनहि; पण आज मला कांहींच सांगतां येत नाहीं. " अत्रे ह्यांनीं लिहिलें : " काव्यांत विचारप्रकटीकरणाचे ठराविक संकेत वापरणें अगदीं अपरिहार्य होऊन बसलें आहे. बाह्य जगतांत बैलगाडीपासून विमानापर्यंत व चकमकीपासून तो विजेच्या बत्तीपर्यंत प्रगति झाली आहे, तरी काव्याच्या सृष्टींत चंद्र व चांदण्या, चातक व चकोर हीं सौंदर्याचीं मिरासदार मंडळी आपापलीं वतनें अद्यापहि संभाळून आहेत ......माझ्या नवीन दृष्टिकोनाला पटणारें काव्य जोंपर्यंत मला स्वतःला करतां येणार नाहीं, तोंपर्यंत मी स्वतः कविता लिहिण्याच्या भागनडींत पडणार नाहीं आणि तें न पडलेलेंच बरें. " नव्या जाणिवेनें ही जी कोंडी निर्माण केली त्यांतून वाट काय ? वाट एवढीच कीं, नवें तंत्र, नवे संकेत निर्माण करावयाचे, नाहीं तर नवी जाणीव तरी गाडून टाकावयाची किंवा काव्यच लिहावयाचें नाहीं.

ही कोंडी फोडण्याचें श्रेय अनिल आणि मर्ढेकर यांस आहे. अनिलांनीं सांगितलें : " नव काव्याचें वाहन होण्यास मुक्तछंदच योग्य आहे." ('भग्नमूर्ति' पान १८ ). त्यांनीं ' भग्नमूर्ति ' हें खंडकाव्य मुक्तछंदांतच लिहून दाखविलें. ' भग्नमूर्ति ' ज्या वर्षी प्रसिद्ध झालें, काणेकरांच्या ' चांदरात 'ची दुसरी आवृत्ति ज्या वर्षी निघाली, त्या १९४० च्या महाराष्ट्र-साहित्यसंमेलनांत ' मुक्तछंद ' हा काय छंद आहे, असला तर तो कोणता, याची वादळी चर्चा झाली. कांहींनीं नुसती टर उडवली. पण हें नवें वाहन मिळाल्यामुळेंच नव्या जाणिवेनें भरलेलें नवें काव्य निर्माण होत आहे, ही गोष्ट लक्षांत घ्यावी. नाहीं तर मागें सांगितलेली काव्यांतली कोंडी कायम राहिली असती. अनिलांनीं नवा छंद दिला तर मर्ढेकरांनीं नवे संकेत दिले.

## नव कविता

नवी जाणीव कवितेंत विशेषत्वानें ओतण्याचें श्रेय बा. सी. मर्ढेकर यांजकडेच जातें. एकोणिसाव्या शतकाच्या शेवटीं जशी एक नवी जाणीव ( व्यक्तिविकासाचें तत्त्व ) केशवसुतांनीं मराठी कवितेला दिली, तशी जवळ जवळ अर्धशतकानंतर मर्ढेकरांनीं दिली. ह्या अर्थानें—फक्त ह्याच अर्थानें—मर्ढेकरांस ' आधुनिक केशवसुत ' म्हणतां येईल. मर्ढेकरांची जाणीव केशवसुतांच्या जाणिवेचा पुढचा भाग होय. व्यक्तिविकास येथें मरून पडला आहे. सध्यांच्या समाजपद्धतीनें व्यक्तीचा निर्दय बळी घेतला आहे ही मर्ढेकरांची जाणीव आहे. केशवसुत आणि मर्ढेकर यांमध्यें फरकहि मोठा आहे. केशवसुत एका नव्या समाजाचें स्वागत करीत होते; एका नव्या समाजाच्या आरंभसीमेवर उभे होते. मर्ढेकर त्याच समाजाला शेवटचा रामराम ठोकीत आहेत. त्या समाजाच्या अंतसीमेवर ते उभे आहेत.

मर्ढेकर आणि य. द. भावे यांच्या कवितेंतील आशय एकच आहे : हें यंत्रयुग आहे, भांडवलशाहीचें युग आहे. ह्या युगांत माणसेंच यंत्रासारखीं जगू लागलीं आहेत. माणसेंच यंत्राचीं दास आहेत. भांडवलशाहींत ( यंत्राच्या खासगी मालकीमुळें ) सामान्य माणूस दरिद्रीच राहिला. दारिद्र्यांत लाचार बनला. समाजांतील विषमता सारखी वाढत आहे. माणसांचा आणि मानव्याचा संहार होत आहे. स्वार्थ, दंभ, फसवणूक यांना ऊत आला आहे. हीं आज उजळ माथ्यानें मिरवीत आहेत. ज्ञान आणि तत्त्वज्ञान संहाराकडेच नेत आहेत. माणूस पूर्णतया निराश बनला आहे. त्याच्यामध्यें ' उगीचता ' किंवा ' विफलता ' भरून राहिली आहे. त्याच्यामध्यें विकृति वाढत आहे. त्याला एकुलता एक विसांवा राहिला—तो म्हणजे स्त्रीसमागमाचा ! देव कुठें आहे ? असला तर तो नरभक्षक असला पाहिजे ! ह्या परिस्थितीची चीड येते. आग लागो त्या जगण्याला असें वाटतें ! मर्ढेकर आणि भावे ह्यांच्या कवितासंग्रहांतून ( अनुक्रमें ' कांहीं कविता ', ' आर्द्रा ' ) यांमधून वरील आशयाचीं कांहीं उदाहरणें केवळ दिग्दर्शनाकरितां पुढें दिलीं आहेत :



अनुक्रमणिका

" चकाकणारे अवलख पिस्टन
हिस्के घेती मारित मिटक्या;
संज्ञेवाचुन संभोगाची
अशीच कसरत असते हलक्या...
पोलादाच्या भव्य पहारी,
जरा न लवती ज्यांच्या भिंवया !
यंत्रमुग्ध अन् होउनि लावा
महालांत या धूप नि समया..."
—( मर्ढेकर, क. २४ )

काळ्या बंबाळ अंधारीं
धपापतें हें इंजिन;
कुष्ट पिंवळ्या पहाटीं
आरवतो दैनंदिन
भोंगा—
" घनश्यामसुंदरा श्रीधरा गिरिणोदय झाला,
उठि लवकरि दिनपाळी ...
कुत्रापि पतितं तोयं यथा गच्छति सागरम्
सर्वचक्रभ्रमस्कारं मालकं प्रति गच्छति
शुभं करोति कल्याणम् दारिद्र्यम् ऋण संपही
शुद्धबुद्धिविनाशाय भोंगाकुत्री नमोऽस्तुते "
—( मर्ढेकर, क. ३६ )

" चोयत्त्या ! चोयत्त्या !
बरें झालें देवा
त्या तरी निर्मिल्या ! ! ( भावे : क. ४ )

जाणें भांडवली वृत्ति । नष्टचर्य पिकवी चित्तीं
आणि कामगारहातीं । करवंटीच ॥
जाणें शुद्ध शुचिर्भूत । एक प्रायोगिक सत्य
जरी त्याचेंच अपत्य । हिरोशिमा.–( मर्ढेकर, क. ११ )

" खंडीखंडीचीं ओझीं वाहून
पाठ पिचली
आणि खालडी तिची निघाली." ( भावे, क. ३३ )

" अशीच होती नकटी एक,
उलटे केस नि तिरप्या भिंवया;
सुरकत दावी उरोज उन्नत
ढेपा जैशा तेलाघरच्या.
काय हलाखी स्त्रीत्वाची ही !
माणुसकीचें काय विडंबन !
भोगशून्य करी भोगव्यथेचें
लिंग-गंड प्रच्छन्न प्रदर्शन !"
—( मर्ढेकर, क. ५२ )

" जेथें निघे धूर । तेथें आहे अग्नी,
आम्ही जमदग्नि । प्रेतरूपी ॥ "
—( मर्ढेकर, क. ७ )

" ...ह्या समयांच्या गोष्टी सांगा;...
फलाटदादा, फलाटदादा
बोला वो तुमि;
गेली गाडी :
बोला वो तुमि !
फलाटदादा, फलाटदादा"–( मर्ढेकर, क. ३१ )

" शेषाच्या ऐटीनें गांडुळें अनंत
डोलत गातात, 'रम्य भाविकाळ !'"
—( भावे, क. ६ )

" आत्मसंतुष्ट मानवी पशू
रवंथ करिती पशू निर्मिती. "
—( भावे, क. २६ )

" मानव विवळे कळवळून
आर्त किंकाळी
भेदून गेली अवकाशाला
पण जवळच...म्हशी टोणगे
हर्षमदानें डोळे मिटुनी
कृष्णगोपींचा खेळ खेळती !"
—( भावे, क. ४७ )

" पिंचे अंधार पोकळ, गाहिंवर येई काळा;
गालीं वाळला ओघळ, दहिंवर झालें गोळा.
तुझ्या भुरक्या केंसाचे, वळ माझ्या गालांवर
माझ्या ढिल्याशा बोटांचे तळ तुझ्या स्तनावर
सोडवेना सोडवीतां गेल्या रात्रींचा हा पाश;
जागा आहे तरी आतां मेल्या इच्छा सावकाश. "
—( मर्ढेकर, क. ४७ )

नवकवींनीं चितारलेली ही परिस्थिति भयानक आहे. अशी परिस्थिति खरोखरच झाली आहे का ? मर्ढेकर-भावे आंग्लवाङ्मयाचे व्यासंगी असल्यामुळें, ईलिअटआदि कवींच्या वाचनानें ते हीं चित्रें भडक रंगवीत असतील. पण त्यांनीं व्यक्त केलेला आशय वास्तव आहे ह्यांत शंका नाहीं. ज्या 'विफलते'चें








त्यांनीं विदारक चित्र रंगविलें आहे, ती युद्धोत्तर निर्माण झाली असा जो कांहींचा समज आहे तो बरोबर नाहीं. विफलतेची भावना सर्व भांडवलशाही समाजांत पहिल्या महायुद्धापासून निश्चित वाढते आहे. गेल्या युद्धानंतर विफलतेची जाणीव फार वाढली, एवढेंच.

## नवकवितेंतील सौंदर्य आणि शुचिता

नवकवितेंत ' जीवनांतील सौंदर्य, कोमलता शुचिता ' ह्यांचा आढळ होत नाहीं, असा यशवंतांचा आरोप आहे ( अध्यक्षीय भाषण, ३३ वें महाराष्ट्र साहित्यसंमेलन, ' साहित्य ', जुलै–ऑगस्ट १९५० पा. ५५ ). हा आरोप असत्य किंवा अर्धसत्य होय. कवि मर्ढेकरांच्या विषयींच बोलावयाचें, तर या कवीला सौंदर्याचें वेड आहे असें वाटतें. ( ' Arts and Man ' ची Introduction पाहा ). त्यांचें ' शिशिरागम ' हें पुस्तक वाचलें असतां त्यांत सौंदर्य आढळतें. पुढील ओळी पाहाव्या :

" माळावरल्या बांधावरतीं विलोलनयना जरा
थांबली कटीं ठेवुनी करा
पश्चिमभागीं बाळ कुणितरी देवदूत चिमुकला
चितारित मेघावली रंगला
नीलाकाशीं शुभ्र कापशी खवल्यांवर जांभळी
झांक ती हलक्या हातें दिली
डोळ्याखालीं अफाट माळहि थेट पुढें लागला
तयावर आम्रवृक्ष एकला
मोहर भरला, चूतमंजरी उन्मादक परिमला
पसरवी लोभविण्या गे तुला... "

किंवा,

" नजर नाचरी नागसुंदरी विलासिनी रोखुनी,
झरझरां जातांना हांसुनी,
गालावरल्या गोड खळीनें शराब जी सांडली
मुशाफिरतृषा तिनें भागली."

ह्या ओळी यशवन्त–गिरीशांच्या नसून मर्ढेकरांच्या आहेत ! नवकवितेची जी गीता–मर्ढेकरांचें ' कांहीं कविता '–तींमधील आणखी हीं उदाहरणें पाहावीं :

पोरसवदा होतीस कालपरवांपावेतों;
होता पायांतहि वाळा कालपरवांपावेतों.
आज टपोरलें पोट, जैशी मोगरीची कळी;
पडे कुशींतून पायीं छोट्या जिवाची सांखळी.
पोरसवदा होतीस कालपरवांपावेतों;
थांब उद्याचे माउली, तीर्थ पायांचें घेईतों.

—( मर्ढेकर, क. २७ )

ही शुचिता नव्हे काय ? भावे ह्यांच्या पुस्तकांतून अशीं कित्येक उदाहरणें देतां येतील. 'अचानक', 'कणीस', 'विव्हल पक्षी', 'रात्र', 'रेशमी मोहर', 'त्या चांदराती', 'तुझ्या स्मृतीला', 'आठवते रेषा', ' माध्यावरती ', ह्या कविता वाचून पाहाव्या. करंदीकर–मुक्तिबोध ह्यांच्याहि पुस्तकांत अशीं अनेक उदाहरणें आहेत. नवकविता–विशेषतः मर्ढेकरांची–ही ' रविकिरण-मंडळा 'च्या ऊर्ध्वमुखी काव्याची प्रतिक्रिया म्हणून कांहीं अंशीं उद्‌भवली आहे हें लक्षांत घ्यावें. 'रविकिरण-मंडळा'च्या कवींनीं केवळ वास्तव वा अवास्तव सौंदर्य आणि शुचिता यांचें दर्शन घडविण्याची जबाबदारी घेतली होती, विग्रह पाहायचेंच टाळलें होतें. प्रतिक्रियात्मक नवकवितेंत विग्रहाचेंच दर्शन जास्त घडलें तर नवल नाहीं.

यशवन्तादि कवींची काव्याकडे पाहण्याची दृष्टि अजून मोहक सौंदर्यवादाची आहे. काव्याला 'जीवितयात्रेंतील पाथेय' म्हणतांना त्यांनीं जें कवितेचें उदाहरण दिलें आहे तें त्याचें दर्शक होय :

' या इथें तरुतळीं एक वही कवितेची
भाकरी एक, अन् सुरई एक सुरेची
आणखी एक तूं जवळ गात या विजनीं
अन् हें न रान मग, नंदनवन तें हेंचि '

उलट पक्षीं, नवकवींना सौंदर्य आणि शुचिता दिसतात तीं अशीं :

" तुकतुकीत अन् तुफान मांड्यांवरतीं
वस्त्र फाटकें भिडलें कमरेभंवतीं;
शाळिग्रामासम तकतकती सतेज काळी कान्ति
उभारलेल्या मुक्त स्तनांवर रुळते काळी माळा
गळ्यांतल्या झोळींतिल बालक करितें तिजशीं चाळा
झोळींखालीं सहजच दृष्टि जाई :
नव्या जीवनाच्या ओझ्याची उदर देतसें ग्वाही.
कृत्रिम आभासांना भेदुन सत्य विश्व पाहाणारी
नजर पुढारी निश्चित आणि करारी
काळ्या दगडांचा पाटा अन् वरवंटा डोक्यावर







घाम निथळतो डोक्यापासुन भूवर.
सह्याद्रीच्या कृष्ण कड्यांतुन कृष्णा वाहत कां ही !...
दिव्य दृश्य जें माझ्यापुढतीं थाटें
पाहुनि तें मज श्रमदेवीचा साक्षात्कारच वाटें.

—( करंदीकर, 'स्वेदगंगा', पा. २९ )

पूर्वी सौंदर्य-शुचितेचे संकेत काव्यांत ठाण मांडून बसले होते. जें वास्तव होतें, महत्त्वपूर्णहि होतें आणि प्रकट करायला हवें होतें, तें ह्या संकेतांनीं अडवून धरलें. आ. अत्रे ह्यांनीं केलेली तक्रार वर आलीच आहे. वा. म. जोशी ह्यांनीं ह्या बाबतींत एक महत्त्वाचा मुद्दा उपस्थित केला होता. तो सौंदर्य-आणि-शुचितेच्या भोक्त्यांनीं मनावर घ्यावा. प्रा. जोशींनीं लिहिलें आहे: "...असा प्रश्न विचारावासा वाटतों कीं, सृष्टि ही एक सुंदर आहे, पावन आहे, आनंदमय आहे अशा प्रकारची भावना आपणांमध्यें जी कित्येक वेळां दिसून येते ती खरोखरच साधार आहे याविषयीं आपण विचार केला आहे काय, का तसें आपलें नुसतें वाटतें म्हणून आपण तसें लिहितां ? सृष्टीमध्यें साप, फुरशीं, वाघ, सिंह, कांटे, पातेरा, चिखल, डबकीं वगैरे ज्या गोष्टी आहेत त्यांकडे आपण दुर्लक्ष करतां, का त्यादेखील तुम्हांला एकाद्या 'दिव्य' व 'अनिर्वचनीय' अर्थानें सुंदर, पावन व आनंदमय वाटतात ? आणि एकादे वेळेस तसें वाटत असलें, तर अशा अनाधार भावनेचें मूल्य काय ? तिचें स्तोम माजविणें इष्ट आहे काय ? तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें कवींनीं विचार करावा, असें मी म्हणत नाहीं. मला भावनेचें स्थान व कार्य समजतें. पण महत्त्वाचीं सत्यें जीं आहेत त्यांजकडे दुर्लक्ष करणारी अविवेकी भावना विशेष इष्ट किंवा सुफलदायी आहे, असें मला वाटत नाहीं. सृष्टिपूजक कवींचा आधुनिक काळांतील जो आदिपुरुष वर्ड्स्वर्थ, त्यालादेखील अखेरीअखेरीला आपल्या सृष्टिविषयक कल्पनांबद्दल व भावनांबद्दल संशय वाटूं लागला होता, हें ह्या कवींनीं ध्यानांत धरावें." ('नन्दादीप', कवि दा. अ. कारे, प्रस्तावना पा. ११). वा. म. जोशी ह्यांनीं सृष्टींतील सौंदर्य व शुचितेविषयीं विचारलें तेंच सबंध जीवनांतील सौंदर्य-शुचितेविषयीं विचारतां येईल.

### नवकवींचे दोन गट

नवकवितेंतील नवविचारांचा विचार करतांना नवकवींमध्यें दोन वेगळे गट आढळतात. एक मर्ढेकर-भावे ह्यांचा आणि दुसरा करंदीकर-मुक्तिबोध ह्यांचा. मर्ढेकर-भावे आणि करंदीकर-मुक्तिबोध हे दोन प्रवाह कांहीं टप्प्यापर्यंत एकत्र वाहतात. भांडवलशाहीनें, यंत्रयुगानें, विज्ञानानें जी मानवाची आणि मानवी मूल्यांची निर्घृण हत्या चालविली आहे, त्याबद्दल मर्ढेकर-भावे आणि करंदीकर-मुक्तिबोध ह्यांमध्यें एकमत आहे. मात्र हे दोन प्रवाह पुढें एकमेकांपासून दूर जातात. पहिला प्रवाह सांचून रहातो पण दुसरा निश्चित लक्ष्याकडे चालला आहे. मर्ढेकर-भावे ह्यांस आज संस्कृतींत निर्माण झालेली कोंडी दिसते पण त्यांतून अचूक मार्ग कोणता हें त्यांस माहीत नाहीं. मानवी संस्कृतीचा अंतकाल जवळ आला एवढेंच ते सांगतात. 'पृथ्वीची तिरडी जळो देवा भली' एवढेंच म्हणून ते थांबतात. मानवाला उज्ज्वल भविष्यकाळ आहे आणि तो त्याच्या हातीं आहे, मानव सृजनशील आहे ह्याची दाद ते घेत नाहींत. बाकीच्या माणसांसारखेच मर्ढेकर आणि भावे 'निराशेचीं बाळें' ( children of despair ) आहेत; परंतु त्यांची ही दृष्टि अनैतिहासिक आणि कोती आहे. समाज हा फिनिक्स पक्ष्यासारखा आहे. एकाच्या राखेंतून दुसरा जन्माला येतो. इतिहासांत ज्या ज्या वेळीं माणूस सामाजिक किंवा सांस्कृतिक अरिष्टांत सांपडला त्या त्या वेळीं तो त्यांतच मेला नाहीं. त्यानें नवा समाज, नवी संस्कृति निर्माण केली. माणसांत, विकास पावण्याची आणि विकसनाला संधि देईल अशी समाजरचना करण्याची प्रेरणा मूलभूत आहे. आज एका संस्कृतीचा अंत दिसत आहे तर दुसरीचा जन्महि दिसला पाहिजे. करंदीकर-मुक्तिबोध ह्यांना मानवांत नवी आशा निर्माण करणाऱ्या समाजाचें स्वप्न पडतें आहे. त्यांच्या त्या 'स्वप्नस्थ वास्तवा'मुळें ते मर्ढेकर-भावे ह्यांपेक्षां अधिक श्रेष्ठ ठरतात.

केवळ प्रचलित संस्कृति घृणास्पद आणि त्याज्य आहे असें सांगून भागत नाहीं. किंबहुना, त्यांत मोठा सामाजिक धोका आहे. कारण प्रचलित संस्कृतीचा त्याग करून दुसरी कोणतीहि संस्कृति स्वीकारण्याचा समाजाला मोह होतो. ती नवी संस्कृति



अनुक्रमणिका

अधिकच भयानक असायची. केवळ विफलतेची कविता समाजाला अधिक संकटांच्या मार्गावर ढकलील. इंग्लंडमधील टी. एस्. ईलिअट ह्या कवीचें असेंच झालें आहे. त्यानें १९२८ मध्यें जाहीर केलें कीं, तो " classicist in literature, royalist in politics and Anglo-Catholic in religion " बनला होता. आपल्या काळांतील राज्यशास्त्राचे एक पंडित प्रोफेसर हॅरोल्ड लास्की ईलिअटविषयीं जें लिहितात तें मर्ढेकर-भावे ह्यांना लागू पडतें :

"No·one can read Mr. Eliot's writings without the admiring conviction that he loathes with all his heart the degradation it ( *i. e.* our society ) imposes by the standards to which it is committed... He leaves them ( *i. e.* people ) to struggle in a corruption they did not cause, and blames them contemptuously for not perceiving the depth of their corruption. The note of disdain and the contempt for the masses is omnipresent; and I call this a betrayal of culture, a form of intellectual treason, because it leaves them prisoners of the dark forces in society to whom it might have sought to communicate their way to emancipation......In the degree that it ( *i. e.* great art ) leaves the masses in the waste land, it leaves them, also, to become the victims of men like Hitler and Mussolini, of mean cults and ugly illusions, of the crude habits which mistake power and pomp for truth and beauty. "—( 'Faith, Reason and Civilisation', pp. 106-7 ).

'स्वप्नस्थ वास्तव'

विंदा करंदीकर आणि शरच्चंद्र मुक्तिबोध ह्यांचें 'स्वप्नस्थ वास्तव' निश्चितपणें समाजवादाचें आहे. करंदीकरांनीं बुद्धिवादाचें हत्यार हातीं घेतलें आहे : " बुद्धिवाद हा झेंडा तुमचा, बुद्धि मिळवा, मिळेल सिद्धि". त्यांना 'साक्षात्कार' झाला आहे. 'स्वेदबिंदू'चें माहात्म्य त्यांना कळलें आहे. त्या स्वेदबिंदूंना ते 'प्रणाम' करतात :

" कांचनगंगेहुन जी सुंदर
भागिरथीहुन जी पावनतर
परमेशाहुन जनहिततत्पर
त्या गंगेतिल स्वेदबिंदुंनो !
प्रणाम माझा तुम्हां निरंतर. "

उद्यांचें जग निर्माण करण्यासाठीं भव्य 'लोकशक्ती'-चा कूच चालल्याचें त्यांना दिसतें आहे :

" लक्षहस्त लक्षपाद लोकशक्ति ही
क्रान्तीच्या दीप्तींतुन मुक्ति शोधिते;
शोधिते नव्या युगास, ज्यांत पूर्णता
पावती अनेक उच्च दिव्य कामना... "

ह्या नव्या युगांत यंत्र नष्ट करायचें कीं काय ? ही लोकसेना इंग्लंडमधील गेल्या शतकांतील Luddites सारखीं यंत्रें फोडायला निघाली कीं काय ? छे, यंत्राचा काय दोष ? यंत्राच्या खासगी मालकीचा तो दोष आहे.

मुक्तिबोधांचा आणि करंदीकरांचा आशय एकच आहे. करंदीकरांनीं 'स्वेदगंगे'ला आवाहन केलें त्याच प्रकारचें मुक्तिबोध करीत आहेत :

" दुधाविना, अन्नाविना मेलेल्या बाळांनो,
खुळा डोळां बघणाऱ्या कंगाल आयांनो,
रस्तोरस्तीं मरणाऱ्या दुर्दैवी जीवांनो,
खोल जखम ही केली प्राण देणाऱ्यांनो—
प्राण तुम्हीं दिले, आम्ही चैतन्य पावलों
अश्रु तुम्हीं दिले, आम्ही आश्रेय जाहलों
आम्ही खोल खोल तुमच्या प्राणांत बुडालों
अगाधता पाहुनीया स्तंभितसे झालों."

—( नवी मळवाट, पा. १२ )

नव्या जगाच्या निर्मितीसाठीं लोकसेना निघाली आहे.








" क्षणांत दीनांची भुकेली सेना कीं
क्षणांत जाज्वल्य मानव विराट ! "

—( नवी मळवाट, पा. २३ )

रुधिराच्या लाल सड्यांतच कवि क्रान्तीचें स्वागत करतो :

" अश्रूंतुन हांसत हांसत स्वागत तव करतों
दुःखानें रुद्ध कंठ तरि जयजय तव म्हणतों
मी प्राण शक्ति केंद्रित करुनी घोर दुःख जगतों
पीडेनें झिंगुनिही नामस्मरण तव करतों "

—( नवी मळवाट, पा. १५ )

करंदीकर-मुक्तिबोध हेच केशवसुतांचे वारसदार होत. केशवसुतांना एक नवा समाज पुढें दिसत होता. त्या समाजांत व्यक्तिविकासाला आशा आहे म्हणून केशवसुतांनीं त्याचें स्वागत केलें. त्या वेळीं दडपलेल्या मानवतेच्या भावनांना केशवसुतांनीं वाचा फोडली. आज करंदीकर-मुक्तिबोध ह्यांनाहि दुसरा नवा समाज दिसत आहे. मानवाच्या विकासासाठीं ते नवयुगाचें स्वागत करीत आहेत. आजच्या दडपलेल्या मानवतेच्या दुःखांना आणि आकांक्षांना करंदीकर-मुक्तिबोध वाचा देत आहेत :

" जड जगताच्या जुलमाखालीं
मानवता जर दडपुनि गेली
ज्वालामुखि ही जागृत झाली
हा लाव्हा रंध्रांतुनि उसळतसे."

—( स्वेदगंगा, पा. ५४ )

" नवी कविता
आज हृदयीं धगधग करी नवा सविता ! "

—( नवी मळवाट, पा. ४ )

---

# उलटली मध्यरात्र

उलटली मध्यरात्र
आणि हास्याची लकेर
गल्लींतल्या सोबतिणी
जिवाभावांची तयांच्या
किती तरी दिवसांनीं
बाळपणींच्या स्मृतींना
वैशाखींच्या तारकांनीं
चंद्रम्याची स्वारी आली
सळसळ वाहे वारा
कुण्या सखीनें गायिलें
लाजे सासूरवासीण
' अडगुलं मडगुलं
पेंगुळल्या ताराराण्या
मायलेक गच्चीवर
जिव्हाळ्याच्या बोलण्यांत
चिम्ब वात्सल्यदंवानें
उलटली गेली रात
मायलेकींना आडवी
' अलबेल ' कानीं आली
पुन्हां एक उसळली
एकवटल्या येऊन
आली सासुरवासीण
पुन्हां योगायोग आला
उमळून पूर आला
नभीं मांडली आरास
कृष्णपक्षांत पूर्वेस
सुगंधाची लयलूट
एक डोहाळ्याचें गीत
' हें ग काय भलतेंच ! '
कडगुलं हें सोन्याचं '
मैतरणी पेंगुळल्या
होत्या परी बसलेल्या
विरे एक एक क्षण
मायलेकींचें अंगण
कथा सांगत, ऐकत
आली खटयाळ पहांट !

—गणेश कुडे










प्रा. स. वा. कोगेकर

# पंचवार्षिक योजनेच्या निमित्तानें

भारत सरकारनें गतवर्षी नेमलेल्या नियोजन-समितीनें आर्थिक विकासाच्या योजनेचा एक कच्चा खर्डा नुकताच प्रसिद्ध केला आहे. पुढील पांच वर्षांत भारताची आर्थिक परिस्थिति सुधारून किमान, महायुद्धापूर्वीच्या राहणीच्या मानाची मजल गांठली जावी, या उद्देशानें समितीनें आपली योजना आंखली आहे. हा उद्देश सफल व्हावा म्हणून आर्थिक क्षेत्रांतील निरनिराळ्या विभागांत किती खर्च करावा लागेल व त्यामुळें उत्पादनांत किती भर पडेल यासंबंधींचे अंदाजी आंकडे समितीनें पुढें मांडले आहेत. त्यावरून १९५१ ते १९५७ या कालांत पुढीलप्रमाणें खर्चाची वर्गवारी केलेली आढळते :

| | कोटी रुपये | शेंकडेवारी |
|---|---|---|
| शेती व ग्रामीण विकास | १९१.६९ | १२.८ |
| पाटबंधारे व वीज | ४५०.३६ | ३०.२ |
| रस्ते, दळणवळण | ३८८.१२ | २६.१ |
| उद्योगधंदे | १००.९९ | ६.७ |
| शिक्षण, आरोग्य, घरें वगैरे सामाजिक सुखसोयी | २५४.२२ | १७.० |
| निर्वासितांची पुनर्वसाहत | ७९.०० | ५.३ |
| इतर | २८.५४ | १.९ |
| एकूण | १४९२.९२ | १०० |

या रकमेपैकीं सुमारें ७३४ कोटींची रक्कम केंद्रीय सरकारनें खर्च करावयाची असून, उरलेली सुमारें ७५९ कोटींची रक्कम भारताच्या निरनिराळ्या घटक राज्यांकरवीं खर्चीं पडावयाची आहे. योजना पूर्ण झाल्यावर ८० लाख एकर जमीन मोठ्या व ७० लाख एकर जमीन छोट्या पाटपाण्याच्या सोयीस पात्र होईल; ४० लाख एकर पडीक जमीन नांगरटीस येईल व आणखी १५ लाख एकर जमीन शेतीस उपलब्ध होईल, अशी अपेक्षा करण्यांत आली आहे. शेतीविषयक नियोजन पार पडल्यास अन्नधान्याचें उत्पादन ७० लाख टनांनीं, तागाचें २० लाख गांठींनीं, कापसाचें १२ लाख गांठींनीं, गळिताच्या धान्याचें ३ लक्ष ७५ हजार टनांनीं आणि साखरेचें जवळ जवळ ६ लाख टनांनीं वाढेल असा अंदाज करण्यांत आला आहे. तसेंच औद्योगिक क्षेत्रांतहि नियोजित उत्पादनवाढीचे पुढील ठळक आंकडे देण्यांत आले आहेत : पोलाद ३ लक्ष टन; सिमेंट २० लक्ष टन; ॲल्युमिनिअम १६ हजार टन; कागद ५६००० टन; वृत्तपत्रीय कागद २४००० टन; मीठ ४ लक्ष टन. वीजपुरवठ्यांत ११ लक्ष किलोवॅटची वाढ अपेक्षित आहे. औद्योगिक उत्पादन मुख्यतः खासगी व्यवस्थेनेंच होणार आहे; सरकारची मदत, देखरेख व नियंत्रण मात्र राहील. शेतीचें उत्पादन सहकारी तत्त्वावर व्हावें यासाठीं प्रयत्न करण्यांत यावयाचे आहेत. इतर क्षेत्रांतील वाढीचे अंदाजहि देण्यांत आले आहेत.

---

एका महत्त्वाच्या प्रचलित विषयावरील हा लेख 'नवभारता'च्या नोव्हेंबरच्या अंकांतच द्यावयाचें योजिलें होतें. त्याप्रमाणें हा लेख आम्हांला ऑक्टोबरमध्येंच मिळाला होता. परंतु पुरेशा स्थलाच्या अभावीं नोव्हेंबर अंकांत हा लेख येऊं शकला नाहीं, तो या अंकांत देत आहोंत. —का. सं.

खर्चाची रक्कम उभी करण्यासाठीं कर, कर्जें व पूर्वीची शिल्लक यांचा उपयोग करण्यांत यावयाचा आहे. चालू करांत वारसा-कराची भर टाकून कराचें उत्पन्न वाढविण्यास मदत होईल अशी अपेक्षा आहे.

किंमतीवर नियंत्रणें घालून विकास-योजनेच्या काळांत संभवनीय असणाऱ्या चलनवाढीवर उपाय-योजना करण्यांत यावयाची आहे.

सध्यांच्या अंदाजाप्रमाणें देशान्तर्गत फक्त ११२१ कोटी रुपये भांडवल उभें करतां येईल. राहिलेली रक्कम कांहीं अंशीं अमेरिकेकडून कर्जाऊ मिळणाऱ्या धान्याच्या आयातीच्या किंमतींतून, तसेंच कॅनडा व ऑस्ट्रेलिया या देशांनीं 'कोलंबो-योजने'प्रमाणें देऊं केलेल्या रकमेंतून उभी करण्यांत येणार आहे. कांहीं अंशीं पंचवार्षिक योजनेच्या कालांत अपेक्षिलेल्या परकीय मदतीवर अवलंबून राहावें लागेल. ही मदत अपेक्षेप्रमाणें मिळाल्यास पंचवार्षिक योजनेंत आणखी १०० कोटींचा भांडवली खर्च करण्यांत यावयाचा आहे. अपेक्षेप्रमाणें परकीय मदत न मिळाली, तरीहि १४९३ कोटींचा पहिला भाग अमलांत आणला जाईल व त्यासाठीं जास्तींत जास्त २९० कोटींचा खर्च चलनवाढीनें करण्यासहि सरकार तयार होईल.

आर्थिक नियोजनाचे अनेक प्रकार असूं शकतात. उदाहरणार्थ, अमेरिका, ब्रिटन व रशिया या देशांत निरनिराळ्या पद्धतीनें नियोजनाचा अर्थ लावला जातो. अमेरिकेंत नियोजनाचें उद्दिष्ट खासगी भांडवलदारी अर्थव्यवस्थेला पोषक अशी परिस्थिति चालू ठेवणें हें असल्यामुळें, तेथील नियोजनांत देशांतील सर्व साधनसामग्रीचा सरकारी नेतृत्वाखालीं उपयोग करण्यांत येत नाहीं. ज्या गोष्टी खासगी भांडवलदारांच्या हातून होणार नाहींत अशा समाज-हिताच्या गोष्टी, उदा० पाटबंधारे, रस्ते वगैरे सरकारमार्फत करण्यांत येतात. तसेंच मजूरवर्गा-साठीं सामाजिक सुरक्षिततेच्या उपाययोजनांची तरतूदहि सरकार करीत असतें. संरक्षणासाठीं आवश्यक असणाऱ्या सामग्रीचा सांठा करणें, युद्धो-पयोगी कांहीं मालाची निर्मिति करणें इत्यादि केवळ संरक्षणाच्या योजनांचाहि सरकारच्या आर्थिक कार्यक्रमांत समावेश होतो. परंतु त्यासाठीं खासगी भांडवलदारी पद्धतीचें उच्चाटन करून देशाच्या एकंदर साधनसंपत्तीवर सरकारचें नियंत्रण ठेवण्याची गरज अमेरिकेला अजून तरी वाटत नाहीं, असें दिसतें. फार तर भावनियंत्रण (यांत सर्व प्रकारच्या किंमतींच्या नियंत्रणाचा समावेश होतो) करून, सरकार विशिष्ट प्रकारें आर्थिक व्यवस्थेला वळण लावण्याचा प्रयत्न प्रसंगविशेषीं करीलहि. पण खासगी मालकीवर अधिष्ठित झालेले आर्थिक व्यवहार पूर्णपणें बंद करून सरकारकडे सर्व आर्थिक घडामोडींचा कारभार घेतला जाईल, अशी तेथें अपेक्षा नाहीं. याचें कारण म्हणजे अमेरिकेची खासगी भांडवलदारी पद्धतीची औद्योगिक परंपरा टिकविण्यास पुरेशी साधनसामग्री अजून तरी त्या देशांतच मुख्यतः उपलब्ध होत आहे, हें होय. त्यामुळें तेथील जनतेच्या आर्थिक विचारसरणींत, खासगी मालकी हक्कांवर गदा आणण्यानें समाजाचें हित होईल, ही कल्पना मूळ धरूं शकली नाहीं.

याउलट रशियांतील अर्थव्यवस्थेचा पायाच खासगी मालकीऐवजीं सरकारच्या नेतृत्वाखालील सार्वजनिक मालकी हा आहे. त्यामुळें आर्थिक नियोजनाचा अर्थ, सरकारनें नेमलेल्या नियोजन-समितीच्या सल्ल्यानें देशांतील आर्थिक साधन-सामग्रीचें सर्वंकष नियोजन असा केला जातो. तेथील अर्थव्यवस्थेंत व्यक्तिगत फायद्याला महत्त्व नसून समाजाच्या हिताच्या दृष्टीनें घेतलेल्या निर्णया-प्रमाणें आर्थिक व्यवहार केले जातात आणि त्या-साठीं सरकारच्या सत्तेचा उपयोगहि केला जातो. १९१७ सालीं झालेल्या क्रान्तींत रशियाला साम्यवादी पुढाऱ्यांचें नेतृत्व लाभलें आणि त्यांनीं साम्यवादी विचारसरणीप्रमाणें सरकारी सत्तेचा उपयोग करून आर्थिक साधनसामग्रीवरील खासगी मालकी हक्कांचें उच्चाटन करून सार्वजनिक मालकीची पद्धति अमलांत आणिली. क्रांतिपूर्व रशियांत अस्तित्वांत असलेली आर्थिक विषमता नाहींशी करून सामान्य जनतेचें राहणीचें मान वाढवावें, देशाचें संरक्षण कार्यक्षमतेनें व्हावें, शास्त्रीय प्रगतीस उत्तेजन मिळावें यांसाठीं सामुदायिक तत्त्वावर रशियांतील आर्थिक व्यवहारांची रचना करण्यांत






येते. त्यासाठीं पंचवार्षिक योजना आंखल्या जातात. त्या योजनांबरहुकूम कार्यक्रम पार पाडण्यासाठीं जनतेचें सहकार्य मिळावें म्हणून सर्व प्रकारचीं साधनें ( यांत प्रचाराला फार महत्त्वाचें स्थान आहे. ) उपयोगांत आणलीं जातात. कम्युनिस्ट पक्षासारख्या शिस्तबद्ध पक्षाच्या हातीं जनतेचें व सरकारचेंहि नेतृत्व असल्यामुळें कार्यक्रम एकदां ठरला कीं, त्याबरहुकूम प्रत्यक्ष कार्य घडवून आणण्यासाठीं या पक्षाच्या सर्व दूर पसरलेल्या सभासदांच्या पुढारीपणाचा पुरेपूर उपयोग केला जातो. जसजसा आर्थिक नियोजनाचा अनुभव येत जाईल तसतशी त्या व्यवस्थेशीं समरस होण्याची जरूरी व इच्छाहि व्यक्तिमात्रांच्या ठिकाणीं निर्माण होईल आणि त्या-नंतर नियोजनाचें कार्य बिनबोभाट चालूं लागेल, असा रशियांतील पुढाऱ्यांस विश्वास वाटतो. गेल्या तीस वर्षांत रशियांतील आर्थिक जीवनांत जी क्रांति घडून आली आहे, तिचें श्रेय तेथील नियोजित अर्थव्यवस्थेस देण्यांत येतें आणि त्या अर्थव्यवस्थेचें श्रेय तेथें १९१७ सालीं झालेल्या क्रांतीस व क्रांती-नंतर राष्ट्राचीं सूत्रें ज्या पक्षाच्या हातीं आलीं त्या कम्युनिस्ट पक्षास देण्यांत येतें. क्रांतीमुळें झालेल्या सामाजिक उलथापालथींत खासगी मालकी हक्क नाहींसे झाले. साम्यवादी विचारसरणीच्या पुढाऱ्यांच्या हातीं सत्ता आली, पुढाऱ्यांनीं त्या सत्तेचा भरपूर उपयोग करून नियोजित अर्थव्यवस्थेचें घोडें दामटलें, आणि त्या अर्थव्यवस्थेनें जनतेच्या जीवनांत क्रांति-कारक बदल घडवून आणला. या सर्व घडामोडींत रशियांतील प्रचंड नैसर्गिक साधनसामग्रीचा भाग अर्थात् महत्त्वाचा आहे. कारण त्याशिवाय केवळ सामाजिक किंवा राजकीय क्रांतीमुळें आर्थिक विकास शक्य झाला नसता.

ग्रेट ब्रिटनची परिस्थिति अमेरिका व रशिया यांच्या दोन टोंकांच्या मधली आहे. तेथील औद्योगिक परंपरेचा पाया साम्राज्यशाहींत सांपडतो. देशांतील नैसर्गिक साधनसामग्रीचा तुटवडा परदेशांतील अंकित वसाहतींतून भरून काढला गेला; आणि व्यक्तिगत भांडवलदारी पद्धतीनें तिचा विनि-योग केला गेला. औद्योगिक क्रान्तीच्या आघाडी-वर असल्यामुळें, इतर देशांत नव्या यांत्रिक उत्पादन-पद्धतीचा विकास होईपर्यंतच्या काळांत सर्व पुढार-लेल्या देशांचें नेतृत्व साहजिकच या देशाकडे आलें. पण औद्योगिक क्रांतीमुळें निर्माण होणारे सामाजिक प्रश्न सोडविण्याची आवश्यकताहि प्रथम येथेंच जाणवूं लागली. संपत्तीचें केंद्रीकरण आणि तज्जन्य सामाजिक विषमता हे प्रश्न इतर सर्व आपत्तींच्या बुडाशीं असल्यामुळें, त्यांकडेच समाजांतील विचार-वंतांचें प्रथम लक्ष वेधलें. हळूहळू विषमतेला गवसणी घालून तिचें क्षेत्र मर्यादित करण्याचा प्रयत्न सुरू झाला आणि त्याचीच परिणति आजच्या अर्थ-व्यवस्थेंत दिसून येते. अमेरिकेप्रमाणें खासगी भांडवलदारी पद्धतीच्या अचूकपणाबद्दल येथें विश्वास वाटत नाहीं; तसेंच रशियाप्रमाणें प्रचंड सामाजिक क्रांतीच्या जोरावरच आर्थिक व्यवस्थेंत बदल घडवून आणतां येईल, अशी विचारसरणी येथील अनुभवावर बसवितां येत नाहीं. शांततेच्या मार्गानें, आस्ते कदम समाजवादाकडे झुकणारी अशी अर्थव्यवस्था तेथें प्रभावी होऊं शकते ती याचमुळें. येथेंहि आर्थिक नियोजन आहे; पण तें फक्त विशिष्ट क्षेत्रा-पुरतें. बाकीच्या क्षेत्रांत व्यक्तिगत आर्थिक घडामोडींना वाव आहे; सरकारचें त्यावर जरूर तेथें नियंत्रण मात्र राहतें. कांहीं उद्योगधंद्यांचें राष्ट्रीयी-करण करून ते सर्वस्वीं सरकारी व्यवस्थेखालीं आण-ण्यांत आले आहेत. भांडवलाचा विनियोग कोठल्या क्षेत्रांत किती करावयाचा तें सरकार ठरवितें, कर-योजनेच्या द्वारां संपत्तीची विभागणी विशिष्ट मर्यादेच्या पलीकडे विषम होऊं नये अशी खबरदारी सरकार घेतें, त्याचप्रमाणें कमी उत्पन्न असणाऱ्यांना सामाजिक-रीत्या सुखसोयी उपलब्ध करून देऊन संपत्तीच्या उपभोगांतील विषमताहि कमी करण्यांत येते. शेंकडों वर्षांचा शासनक्षेत्रांतील अनुभव, एकजिनसी समाज, दोन महायुद्धांत तावूनसुलाखून निघालेली शासनपद्धति व जनतेंतील परस्पर सहकार्य यांच्या आधारावर आज ब्रिटनमध्यें ‘ मिश्र ’ अर्थव्यवस्थें-तील नियोजन चालूं आहे.

वर उल्लेखिलेले तीन देश ज्या प्रकारांनीं ‘आर्थिक नियोजन ’ करतात त्यांकडे पाहिल्यास ‘ आर्थिक नियोजन ’ म्हणजे फक्त एका विशिष्ट प्रकारानें केलेलें नियोजन असें म्हणतां येणार नाहीं. स्थल-







काल-परिस्थितींप्रमाणें त्या त्या देशांत भिन्न भिन्न उद्दिष्टांना प्राधान्य दिलें जातें, भिन्न भिन्न पद्धतीनें तीं उद्दिष्टें साध्य केलीं जातात. कोठल्याहि योजनेचें अंतिम यशापयश सरकारच्या कार्यक्षमतेवर व जनतेच्या सहकार्यावर अवलंबून राहणार, हें उघड आहे. योजना करतांना या गोष्टींच्या मर्यादा त्याचसाठीं लक्षांत घेणें अत्यावश्यक आहे.

आर्थिक नियोजन हा केवळ अर्थशास्त्राचा प्रश्न नाहीं. जमीन, खनिज संपत्ति, जंगलें, यंत्र-सामग्री, हरतऱ्हेचा कच्चा माल, आगगाड्या, जहाजें वगैरे वाहतुकीचीं साधनें, आयात-निर्यात इत्यादि साधनसामग्री विशिष्ट प्रमाणांत एकत्र आणून उपयुक्त गोष्टींचें उत्पादन करावयाचें व उत्पादित वस्तूंची विभागणी करावयाची—या घडामोडी जरी अर्थशास्त्राच्या व्याप्तींत येत असल्या, तरी आर्थिक व्यवहार हा अशा केवळ निर्जीव साधनांवर अवलंबून नाहीं. या साधनांचा उपयोग माणसाकरवीं करावा लागतो. उत्पादन-विभजनांत सहभागी होणारा माणूस हा एका अर्थी वरील गोष्टींप्रमाणेंच एक साधन आहे हें खरें, पण तें सजीव, सचेतन असें साधन आहे; आणि कळसूत्री बाहुलीप्रमाणें सदैव दुसऱ्याच्या बुद्धीनें, शक्तीनें किंवा हालचालीनें चालणारें साधन नाहीं. तसेंच तें केवळ साधन नाहीं, तर साध्यहि आहे; आणि म्हणून माणुसकीला कमीपणा आणून या साधनांची कार्यक्षमता वाढणार असेल, तर ‘साधन मिळालें पण साध्य गमावलें’ अशी एक बिकट समस्या पुढें उभी राहते. ती टाळावयाची असल्यास आर्थिक नियोजनाकडे विशिष्ट रसायनें विशिष्ट प्रमाणांत एकत्र करून विशिष्ट प्रक्रिया घडवून आणणाऱ्या रसायनशास्त्रज्ञाप्रमाणें पाहून चालणार नाहीं. कारण, बाटलींतील रसायनांप्रमाणें शास्त्रज्ञाच्या इच्छेनुरूप कमीजास्त प्रमाणांत इतर रसायनांत बिनबोभाट मिसळून आपलें ठरीव काम देणारीं साधनें, असें मानवी प्रयत्नाचें स्वरूप नाहीं. कोठल्या प्रमाणांत किती साधनसामग्री एकत्र आणली असतां विशिष्ट उत्पादनव्यवस्था अधिकांत अधिक फलदायी होईल हें अर्थशास्त्रज्ञ कदाचित् सांगूं शकतील; विशिष्ट उद्दिष्ट साध्य करण्यासाठीं सर्वांत कार्यक्षम आर्थिक यंत्रणा कोणती करतां येईल हेंहि ते सांगूं शकतील. आणि आर्थिक नियोजनांत या दोन्ही प्रकारच्या निर्णयांना महत्त्वाचें स्थान आहे हेंहि खरें. परंतु केवळ योजना कागदावर मांडली कीं ती प्रत्यक्षांत अंमलांत आलीच, असें होत नाहीं. त्या योजनेशीं एकरूप होणारीं माणसें असलीं, अशीं माणसें परस्परांत सहकार्यानें काम करण्यास तयार असलीं, आणि खडतर कालांतहि तें सहकार्य टिकवून धरून जनतेचा उत्साह वाढीस लावणारें नेतृत्व अस्तित्वांत असलें, तरच कागदी योजना प्रत्यक्षांत येणार. या गोष्टींच्या अभावीं नुसते कायदे करून जनतेचें सहकार्य मिळवितां येत नाहीं. हा अनुभव सर्वत्र येत असल्यामुळें, आर्थिक नियोजनाचा प्रश्न हा मानवी संबंधां-( human relations )चाहि प्रश्न झाला आहे. विशेषतः ज्या वेळीं आपण सर्वंकष आर्थिक नियोजनाचा विचार करतों, त्या वेळीं या प्रश्नाचें महत्त्व फारच मोठें आहे, हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

सर्वंकष नियोजनांत मध्यवर्ती नियोजकमंडळानें घेतलेल्या निर्णयाबरहुकूम काम व्हावें लागतें. त्यांत कसूर झाल्यास त्याचे परिणाम विशिष्ट व्यक्ति अथवा क्षेत्र एवढ्यापुरतेंच मर्यादित न राहतां, सबंध अर्थव्यवस्थेला बाधक होण्याचा संभव असतो. अशा परिस्थितींत आम जनतेचें सहकार्य निश्चितपणें मिळेल अशी खात्री असल्याशिवाय सर्वंकष नियोजनाला हात न घालणेंच शहाणपणाचें ठरेल. हें सहकार्य मिळण्याचे तीन प्रकार असूं शकतील : एक म्हणजे जनतेनें जाणतेपणानें पत्करलेल्या ध्येयवादाच्या प्रभावामुळें, विशिष्ट ध्येय गांठण्यासाठीं एकत्र येऊन सहकार्य देणें. म्हणजे आळीकर मंडळी गणपति-उत्सवासारख्या प्रसंगीं रात्रंदिवस खपून व वैयक्तिक झीज सोसूनहि एकत्र काम करतात तसा कांहींसा प्रकार. या प्रकारचें सहकार्य आर्थिक नियोजनाचें ध्येय गांठण्यास मिळालें तर यश हमखास ठरलेलें. पण आर्थिक नियोजनाचे दृश्य परिणाम कालान्तरानेंच अनुभवास येणार असल्यानें व त्यांतील काम केवळ फुरसतीचा खेळ अशा स्वरूपाचें नसल्यानें, निव्वळ स्वयंस्फूर्तीनें या कामांत








दीर्घकाळ शिस्तशीर सहकार्य करण्यास लोक पुढें येतील, असा संभव सध्यां तरी दिसत नाहीं. दुसरा प्रकार, ध्येयवादी पक्षाच्या नेतृत्वानें जनतेस सहकार्यास उद्युक्त करून तें मिळविणें. अशा पक्षाचें यश आपल्या ध्येयप्रणालीविषयीं व कार्यकर्त्यांविषयीं जनतेंत विश्वास निर्माण करण्यावर अवलंबून राहील हें उघड आहे. आजच्या सामाजिक व राजकीय परिस्थितींत लोकशाही पद्धतीला धरून जर आर्थिक नियोजन घडवून आणावयाचें असेल, तर तें या मार्गानें जनतेचें सहकार्य मिळवूनच आणावें लागेल; मात्र ज्याप्रमाणें पक्षाच्या नेतृत्वावर हें सहकार्य अवलंबून राहील, त्याचप्रमाणें जनतेच्या मनोवृत्तीवरहि तें राहील. आपल्या सामुदायिक आर्थिक उन्नतीसाठीं आपण प्रयत्न केला पाहिजे, त्यासाठीं झीज सोसली पाहिजे, अशी विचारसरणी जनतेंत प्रभावी झाली नसेल तर सहकार्याच्या फक्त वल्गना केल्या जातील; प्रत्यक्ष कार्यासाठीं कोणी पुढें येणार नाहींत. या प्रकारच्या मनोवृत्तींत पालट घडवून आणणें हीदेखील पक्षनेत्यांची व कार्यकर्त्यांची जबाबदारी ठरते.

या दोन प्रकारांशिवाय तिसराहि एक सहकार्याचा प्रकार आहे, पण त्यांत सहकार्याची भावना मात्र नाहीं. तो प्रकार म्हणजे हुकूमशाहीचा. मानवी संबंधांचें ज्यांना महत्त्व वाटत नाहीं अशा 'निसर्गशास्त्रज्ञां'ना आणि त्यांच्या विचारसरणीशीं सहमत असणाऱ्या मंडळींना हा प्रकार आकर्षक वाटतो. जर्मनींत हिटलरी अमदानींत हा प्रकार रूढ होता. केवळ दंडुक्याच्या जोरावर जनतेला नियोजनांत सहभागी बनवितां येईल; पण मग तें नियोजन जनतेच्या हितासाठीं आहे व जनतेला तसें तें वाटतें असें मात्र म्हणतां येणार नाहीं. असें म्हणतां येणें हें लोकशाही व्यवस्थेचें गमक असल्यामुळें, ज्यांचा लोकशाहीवर विश्वास आहे त्यांना हा प्रकार मान्य होण्यासारखा नाहीं. अशा प्रकारचें 'सहकार्य' किती काळ टिकेल, हाहि एक प्रश्नच आहे.

वरील विवेचनाच्या अनुषंगानें आज आपल्या देशाच्या परिस्थितीकडे पाहिल्यास काय दिसतें ? आपणांस असें दिसतें कीं, चालू आर्थिक व्यवस्थेविषयीं सर्वत्र असंतोष आहे. पण त्यापलीकडे जाऊन ही घडी बदलून नवी घडी बसविण्यासाठीं सर्वंकष आर्थिक नियोजन करण्याच्या कामीं अनुकूल अशी परिस्थिति आज आपणांस दिसते काय ? याचें उत्तर नकारार्थी दिलें पाहिजे. त्याचें कारण असें कीं, आपल्यासारख्या मागसलेल्या देशाची आर्थिक उन्नति घडवून आणावयाची असल्यास त्यासाठीं मोठ्या प्रमाणावर भांडवलाची उभारणी केली पाहिजे. ही उभारणी करावयाची म्हटल्यास आज मिळणाऱ्या तुटपुंज्या उत्पन्नांतहि कपात करून घेण्याची आपली तयारी पाहिजे. त्याचबरोबर अधिक काम करूनसुद्धां आपल्या उत्पन्नांत लगेच वाढ होईल अशी अपेक्षा बाळगतां कामा नये. हरप्रकारचे नियंत्रणादि नियम पाळले पाहिजेत. या गोष्टी स्वयंस्फूर्तीनें करावयास जनता पुढें येईलच असें वाटत नाहीं. त्याचबरोबर या गोष्टींबाबत जनतेचें मन वळवील व तिचें नेतृत्व स्वीकारील असा पक्षहि आज डोळ्यांपुढें दिसत नाहीं. ज्या काँग्रेसपक्षाकडे आर्थिक परिवर्तन घडवून आणण्यासाठीं पाहिलें जात होतें, त्या पक्षांत सत्तासंपादनानंतर जें परिवर्तन झालें, त्यामुळें आज सर्वत्र निराशा व्यक्त करण्यांत येत आहे. आर्थिक नियोजनाविषयीं जनतेंत उत्साह निर्माण करतील आणि त्या उत्साहाच्या जोरावर सरकारकडून नियोजित व्यवस्थेचा अंमल करवून घेतील, असे जनतेच्या विश्वासांतील कार्यकर्ते काँग्रेसमध्यें फारसे राहिलेले नाहींत. जे आहेत त्यांचें सत्ताधीशांवर परिणामकारक वजन पडत नाहीं. महात्मा गांधींनीं जो विधायक कार्यकर्त्यांचा वर्ग निर्माण केला त्याची विचारसरणी सामान्य जनतेला पटण्यासारखी किंवा आचरणांत आणण्यासारखी वाटत नाहीं. अशा परिस्थितींत सर्वंकष नियोजनाविषयीं जनतेंत प्रचार फार तर करतां येईल, परंतु आज व तें अंमलांत येईल ही आशा करणें अव्यवहार्य मानलें पाहिजे.

परकीय सरकारच्या अमदानींतील राजकीय चळवळीच्या विशिष्ट स्वरूपामुळें आमच्या आकांक्षा मात्र मनस्वी वाढलेल्या आहेत. औद्योगिक दृष्ट्या पुढारलेल्या पाश्चात्त्य राष्ट्रांशीं प्रत्येक बाबतींत तुलना करून आमच्या हीनत्वाचा संबंध परकीय सत्तेशीं












जोडल्यामुळें, स्वातंत्र्य मिळतांक्षणींच येथें स्वर्ग निर्माण होईल अशी भोळी आशा आमच्यांत बळावत गेली. त्यामुळें आतां आपल्या सरकारनें अमुक केलें पाहिजे, तमुक दिलें पाहिजे, असें आम्ही म्हणूं लागलों आहोंत. परंतु त्यासाठीं स्वतः झीज सोसली पाहिजे याची जाणीव मात्र आमच्यांत तितक्याच तीव्रतेनें निर्माण झालेली नाहीं. कदाचित् असेंहि म्हणतां येईल कीं, महायुद्धामुळें निर्माण झालेल्या आर्थिक दुःस्थितीचा फायदा कांहीं मूठभर लोकांनीं करून घेतल्यामुळें, जोंपर्यंत त्यांच्या संपत्तीवर नियंत्रण घातलें जात नाहीं तोंपर्यंत सामान्य जनतेंत सरकारबद्दल विश्वास वाटून स्वतः झीज सोसण्याची तयारी तिच्यापासून अपेक्षिणें योग्य होणार नाहीं. परंतु ही विचारसरणी सध्यांच्या उदासीनतेचें एकमेव कारण आहे असें सांगणें धाष्टर्याचें होईल. कारण प्रचलित परिस्थिति बदलून घ्यावी असें तळमळीनें वाटणारे व त्यासाठीं तरी झीज सोसणारे कार्यकर्ते पुरेसे कोठें आहेत ? व त्यांचा प्रभावहि दृष्टोत्पत्तीस कां येत नाहीं ? आमच्या समाजांत सर्वत्र पसरलेली जातीयता व सामाजिक मागसलेपणादेखील सामुदायिक सहकार्याच्या आड आल्याशिवाय राहत नाहीं. त्यामुळें ध्येयवादानें न सांधलेला, जातीयवादानें पोखरलेला, शास्त्रीय प्रयोगांकडे व विचारांकडे केवळ कौतुकाचा विषय म्हणून पाहणारा किंवा त्यांचा उघड तिरस्कार करणारा असा हा समाज योग्य नेतृत्वाच्या अभावीं अगदीं शास्त्रशुद्ध आंखलेल्या आर्थिक नियोजनाच्या कार्यांत मनापासून सहकार्य करील अशी अपेक्षा करतां येत नाहीं.

असा एक सूर अलीकडे ऐकूं येतो कीं, सरकारनें निश्चित आर्थिक धोरण आंखलें आणि तें धोरण धडाडीनें अंमलांत आणण्याचा प्रयत्न केला, तर तो बहुतांशीं यशस्वी होईल. सरकारनें आपल्याकडे आर्थिक नियंत्रणाचे अधिकार कायद्यानें घ्यावयाचे व ते कडकपणें वापरावयाचें असें ठरविलें मात्र पाहिजे. या नियंत्रणव्यवस्थेंतूनच हळूहळू सर्वंकष आर्थिक नियोजनाकडे पाऊल टाकतां येईल. पण नियंत्रणव्यवस्थेचा जो अनुभव आपणांस आलेला आहे त्यावरून दोन गोष्टी अगदीं स्पष्टपणें दिसून येतात : एक तर ज्या सरकारी यंत्रणेंतून नियंत्रणें अंमलांत आणावयाचीं तीं तितकीशीं कार्यक्षम असत नाहींत. सरकारी नोकरांनाच नियंत्रण व्यवस्थेच्या आवश्यकतेविषयीं व यशाविषयीं उत्साह वाटत नाहीं. अर्थात् अपवाद कोठेंहि असतातच. दुसरें, जनतेंतहि नियंत्रणाबाबत सहकार्य करण्याची जाणीव नाहीं. याचें प्रमुख कारण हेंच कीं, नियंत्रणांची आवश्यकता पटवून त्यांच्या यशस्वितेबद्दल जागरूकपणें सहकार्य देण्याचा उत्साह जनतेंत निर्माण करील, असें नेतृत्व आज आपल्या देशांत आढळत नाहीं. सरकार आणि जनता यांना सांधणारा दुवाच त्यामुळें निखळून पडलेला आहे. अर्थातच सर्व मदार सरकारी अधिकाऱ्यांकरवीं नियंत्रणाचें कार्य करवून घेण्यावर ठेविली जाते. पण सरकारी अधिकारी जनतेचें पुढारीपण करूं शकतील अशी परिस्थिति आपल्या राजकीय पूर्वपीठिकेमुळें येथें आज तरी अशक्य आहे. त्यांतच ब्रिटिश अमदानींतील सरकारची कार्यपद्धति अकरणात्मक असल्यामुळें, आणि त्याच परंपरेंतील सरकारी राज्यव्यवस्था आजहि चालू असल्यामुळें विधायक कार्य करवून घेण्याच्या बाबतींत सरकारी यंत्रणेवर अवलंबून राहतां येणार नाहीं. आजपर्यंतच्या सरकारी कार्यपद्धतीचा सर्व भर जनतेकडून कर वसूल करणें व शांततेला बाध येईल अशा गोष्टींना पायबंद घालणें यांवर होता. ‘ अमुक गोष्ट करूं नका ’, ‘ अमुक ठिकाणीं जमूं नका ’, ‘ अमुक बोलूं नका ’—अशा प्रकारें काय करूं द्यावयाचें नाहीं तें ठरवून त्याला अनुसरून केलेल्या कायद्यांची अंमलबजावणी करण्याकडे सरकारचा कल होता. आणि जनतेचा पाठिंबा नसतांहि केवळ दंडुक्याच्या जोरावर अशा प्रकारचे कायदे अंमलांत आणणें शक्य झालें. पण आर्थिक नियोजनाच्या दृष्टीनें अशा प्रकारच्या कायद्यांनीं आतां कार्यभाग साधणार नाहीं. किती तासांपेक्षां जास्त काम घेऊं नये हें कायद्यानें ठरवितां येईल; पण ठरलेल्या वेळेंत जास्तींत जास्त काम केलें जाईल हें कायदा कसें सांगूं शकेल ? उत्पादनाच्या प्रमाणांत वेतन देण्याची योजना कायद्यानें आंखतां येईल, पण अधिक वेतन मिळविण्याची ईर्ष्या कायदा निर्माण करूं शकणार नाहीं. जमिनीचा अमुक

## पंचवार्षिक योजनेच्या निमित्तानें

भाग अन्नधान्यासाठीं लावलाच पाहिजे असें कायदा सांगूं शकेल, पण त्या भागाकडे ऊंस किंवा कापूस लावलेल्या भागाइतकेंच लक्ष दिलें पाहिजे, योग्य तें खतपाणी दिलें पाहिजे या गोष्टी नियंत्रणाचा कायदा करूं शकेल काय? निदान आजच्या अनुभवावरून तरी केवळ सरकारी यंत्रणेवर विसंबून या गोष्टी करतां येतील असें म्हणवत नाहीं. कारण नियंत्रित अर्थव्यवस्थेला अनुकूल अशी मनोभूमिका आमच्या समाजांत अजून निर्माण झालेली नाहीं. ती निर्माण करील असें गतिमान् नेतृत्व आम्हांला अजून लाभलेलें नाहीं. अशा परिस्थितींत आजच्या सरकारनें आपल्या खांद्यावर सर्वंकष आर्थिक घडामोडींची जबाबदारी घेणें म्हणजे सध्यांच्या सदोष परिस्थितींत निश्चितपणें माहीत असलेल्या धोक्याऐवजीं अनिश्चित अशा संकटांच्या दरींत उडी घेण्यासारखें आहे. हा धोका पत्करण्यांत शहाणपणा तो काय?

आजच्या सरकारनें पुढें मांडलेली पंचवार्षिक योजना या पार्श्वभूमीवर ठेवल्यास तिच्यामुळें आपलें समाधान कां होत नाहीं याचा उलगडा होतो. त्याचबरोबर आर्थिक व्यवस्थेंतील मूलगामी प्रश्नांना डावलून केवळ आजच्यापेक्षां अधिक उत्पादन काढण्याइतकेंच मर्यादित उद्दिष्ट योजनाकारांनीं आपल्या डोळ्यांपुढें कां ठेवलें असावें, याचाहि खुलासा होतो. आपलें समाधान होत नाहीं याचें एक कारण स्वातंत्र्यप्राप्तीनंतर ज्या भव्य घडामोडींची आपण वाट पाहत होतों त्यांचें दर्शन या योजनेंत आपणांला होत नाहीं. दुसरें कारण असें कीं, योजनेंत निर्देश केलेला कोट्यावधि रुपयांचा खर्च करून योजना यशस्वी झाली, तरी शेवटीं युद्धपूर्वकालाइतपतच आपलें उत्पादनाचें मान वाढणार आणि तें आजच्याहून फारसें वरती नसल्यामुळें आपल्याला निराशा वाटते. तिसरी गोष्ट अशी कीं, आपलें रहाणीचें मान आजच इतकें खालावलें आहे कीं, त्यांत अपरिहार्य अशा पुढील भाववाढीमुळें आणि नियंत्रणाच्या आजपर्यंतच्या अनुभवामुळें आणखीच कपात होणार ही गोष्ट आपणांला योग्य वाटत नाहीं. आणि चौथें कारण असें कीं, सरकारच्या हातून ही योजनादेखील तडीस जाईल असा आपल्याला विश्वास वाटत नाहीं. त्याशिवाय योजनेंतील तपशिलाबाबतहि आपलीं गाऱ्हाणीं आहेत. शेतीऐवजीं उद्योगधंद्याकडे अधिक लक्ष दिलें नाहीं, सर्वांना काम मिळेल अशी व्यवस्था केली नाहीं, अन्नधान्याच्या उत्पादनांत आपण स्वयंपूर्ण होत नाहीं, विशिष्ट धंद्यांचें राष्ट्रीयीकरण केलें जात नाहीं, भांडवली योजनांची प्रदेशवार केलेली विभागणी सदोष आहे वगैरे अनेक दोषांबद्दल योजनेवर टीका करण्यांत आली आहे.

प्रत्येक टीकाकाराचा दृष्टिकोन भिन्न असल्यामुळें अशा प्रकारची टीका होणें स्वाभाविकच आहे. आर्थिक विकासासंबंधीं एका विशिष्ट दिशेनें विचार करून मनामध्यें कांहीं एक योजना ज्यांनीं आंखली आहे त्यांना त्यांच्या योजनेंत व सरकारी योजनेंत तफावत दिसली कीं, तो टीकेचा विषय होणें अपरिहार्य आहे. तसेंच आर्थिक क्षेत्रांत वावरणाऱ्या असंख्य हितसंबंधीयांच्या जीवनावर होणाऱ्या परिणामाप्रमाणें साधकबाधक टीका होणें हेंहि स्वाभाविकच आहे. ज्या टीकेचा रोख सरकारी योजनेंतील विसंगति-स्थानें दाखवून तीं नाहींशीं करण्याच्या दृष्टीनें सूचना करणें यावर आहे, तिचा सरकारनें योग्य तो फायदा करून घेऊन आपल्या योजनेस शक्य तितकें निर्दोष स्वरूप दिलें पाहिजे असेंच कोणीहि म्हणेल.

योजनेच्या जनकांनीं जी योजना मांडलेली आहे तींतून देशाच्या सामाजिक व आर्थिक परिस्थितींत क्रांतिकारक परिवर्तन घडून येणार आहे, असा त्यांचाहि दावा नाहीं. किंबहुना, लोकशाही राज्यपद्धतीच्या चौकटींत, शक्याशक्यतेचा विचार करून व्यवहार्य काय ठरेल तेवढेंच या योजनेंत गोंवलेलें आहे. त्यांतहि कित्येक प्रश्न अजून अनिर्णीत आहेत. त्यांचा यथावकाश विचार करून योजनेस जरूर ती मुरड घालण्याची किंवा पुस्ती जोडण्याची त्यांची तयारी आहे, असा खुलासा योजनाकारांनीं ठिकठिकाणीं केलेला आहे. पुढें आलेली योजना ही खरोखरीच 'एक कच्चा खर्डा' या स्वरूपांतील आहे. आजच्या अपरिपक्व अवस्थेंत जनतेचें सहकार्य कोठपर्यंत मिळूं शकेल याचा अंदाज करून तिची

आंखणी करण्यांत आली आहे. याचें एक उदाहरण म्हणून शेतीच्या धंद्याचें देतां येईल. जमिनीच्या मालकी हक्कावर ( जमीनदारीवर नव्हे; पण जमीनदारी नष्ट झाल्यावर देखील कसणाऱ्याच्या मालकीची जमीन होणार आहे अशी कल्पना आहे. ) गदा आणून सामुदायिक शेती करण्याइतपत आज आपल्या शेतकऱ्यांची तयारी नाहीं; तेव्हां मालकी हक्क शाबूत ठेवून सहकारी शेतीच्या तत्त्वाचा पाठपुरावा करण्यांत आला आहे. पण ही गोष्टहि तावडतोब होणारी नाहीं. त्यासाठीं देखील शेतकऱ्याला 'तयार' केला पाहिजे. अशा प्रकारें मोठ्या प्रमाणावर शेती करूं लागल्याशिवाय शास्त्रीय पद्धतींचा अवलंब करतां येणार नाहीं. पण सक्तीनें ही गोष्ट करावयाची नाहीं. तेव्हां या दृष्टीनें प्रयत्न होत असतांना, आजच ज्यांच्या मालकीची मोठी जमीन आहे त्यांना शास्त्रीय दृष्ट्या शेती करण्यास भाग पाडावें असा विचार आहे. 'रजिस्टर्ड फार्म्स' म्हणून अशा जमिनींना संबोधण्यांत येणार असून त्यांच्या मालकांना जमिनीच्या लागवडींत सरकार विशिष्ट प्रकारें सुधारणा करण्यास भाग पाडणार आहे. या मालकांनीं सरकारला आपलें शिलकी धान्य, तसेंच बी-बियाणांची सुधारणा करून तें, विकलेंच पाहिजे. त्यांच्या शेतीवर खपणाऱ्या मजुरांस सरकारनें ठरवून दिलेलें वेतन व इतर सोयी करून दिल्याच पाहिजेत. असे शेतमालक संख्येनें कमी असल्यामुळें व सरकारचें संरक्षण त्यांस आवश्यक असल्यामुळें या प्रकारची सक्ती करण्याच्या मार्गांत विशेष अडचणी उत्पन्न होणार नाहींत हें उघड आहे. या पद्धतींत सरकारचा कारभार अकार्यक्षम ठरल्यास मोठ्या जमीनदारांना एक प्रकारें सरकारी संरक्षण दिलें जाईल, पण त्यांच्याकडून अपेक्षिलेली सामाजिक जबाबदारी पार पाडण्याची दक्षता घेतली जाणार नाहीं, हें खरें आहे. पण अशी भीति ज्यांना वाटते तेच सरकारनें मोठमोठ्या उद्योगधंद्यांची जबाबदारी आपल्या शिरावर घ्यावी असें आग्रहानें प्रतिपादतात, याचें आश्चर्य वाटल्याशिवाय राहत नाहीं.

कागदावर एखादी आकर्षक विकास-योजना मांडली कीं तेवढ्यानें विकास घडून येत नसतो. अशी विकास-योजना फार तर प्रचाराचें एक साधन बनेल. पण ती पेलण्याचें सामर्थ्य निर्माण झाल्याशिवाय तिची अंमलबजावणी करण्याच्या गोष्टी व्यर्थ होत. आजची विकास-योजना केवळ कागदावर राहण्याकरितां केली आहे असें तिच्या मांडणीवरून दिसत नाहीं. आणि आजच्या परिस्थितींत व्यवहार्य ठरणारी कोणतीहि योजना क्रांतिकारक स्वरूपाची असूं शकणार नाहीं. सामाजिक परिवर्तनाच्या दिव्यांतून न जातां त्या परिवर्तनाचीं फळें चाखावयास मिळावीं अशी आपली अपेक्षा असल्यास कोणतीहि व्यवहार्य योजना आपणांस समाधानकारक वाटणार नाहीं. अशा एका विलक्षण दुःश्चक्रांत आपण आज सांपडलेलों आहोंत.

( १९-१०-५१ )

## 'तुझी गरज माझ्यापेक्षां जास्त'!

नुकतेंच ब्रिटिश विमानखात्यांतील एका वरिष्ठ अधिकाऱ्याला त्याच्या अतुल शौर्याबद्दल 'जॉर्ज क्रॉस' हें मानचिन्ह जाहीर करण्यांत आलें. तो क्विटन नांवाचा वैमानिक अधिकारी विमानानें जात असतांना त्याच्या विमानाची दुसऱ्या विमानाशीं आकाशांत टक्कर झाली. त्याच्या शेजारीं १६ वर्षांचा एक शिकाऊ वैमानिक उमेदवार बसला होता. टकरीमुळें विमान कोसळून मृत्युमुखांत पडण्याची वेळ आली होती. जवळ एकच पॅराशूट छत्री होती. त्यामुळें एकाचाच जीव वांचणें शक्य होतें. क्विटननें स्वतः ती छत्री न वापरतां उदारपणें ती आपल्या तरुण वैमानिकाला दिली. या घटनेसंबंधीं 'डेली ग्रॅफिक' नांवाच्या वृत्तपत्रानें म्हटलें आहे : "मृत्यूला एकाची आहुति पाहिजे होती. अशा वेळीं क्विटननें स्वतःला वांचविण्यापेक्षां दुसऱ्याला वांचविणें पसंत केलें. अशा निर्वाणीच्या समयीं निवड करावयाची वेळ आली असतांना ब्रिटिश स्त्री-पुरुष अशाच धीरोदात्तपणें वागत आले आहेत. असें धीरोदात्त वर्तन आम्हा ब्रिटिशांचें वैभव आहे!"

डॉ. गो. स. सरदेसाई

# महादेवी गौतमी बलश्री

महाभारत, रामायण व पुराणें हे आम्हा आर्यांचे इतिहासग्रंथ समजले जातात. याच ग्रंथांच्या आधारावर आपल्या महाकवींनीं बुद्धि-कौशल्य खर्चून नानाविध उत्कृष्ट कृती निर्माण केल्या आहेत. पण यांहिपेक्षां प्राचीन इतिहास प्रकर्षानें बोलणारे पुष्कळ प्राचीन शिलालेख अलीकडे प्रसिद्ध झाले असून, अद्यापि पूर्वी अज्ञात असलेले किती तरी नवीन शिलालेख बाहेर येत आहेत. हें शिलालेखांचें प्रचंड वाङ्मय सामान्य वाचकांच्या दृष्टीस पडत नाहीं. तें शोधणें, वाचणें, नकलणें व छापणें हीं कामें अवघड व खर्चाचीं असल्यामुळें, अशा शिला लेखांत केवढें ऐतिहासिक वृत्तभांडार समाविष्ट आहे याची कल्पनाहि आपणांस नाहीं. शेंकडों-हजारों वर्षांच्या कालोदधींत सूर्यताप, पर्जन्य, वायु इत्यादींचा मारा सहन करीत हे लेख गिरिगव्हरांच्या अज्ञातभागीं उघड्यावर पडून राहिल्यानें लोकांचें लक्ष त्यांजकडे गेलें नाहीं. प्रसिद्ध झालेल्यांच्या मानानें असे किती लेख कायमचे नाश पावले असतील कोणांस ठाऊक ! दक्षिणेंत ज्या मानानें अशा शिलालेखांचें संशोधन व प्रसिद्धीकरण झालें आहे, तसें मला वाटतें, उत्तर हिंदुस्थानांत अद्यापि झालेलें नाहीं. संशोधकांपुढें आज हें केवढें तरी नवीन क्षेत्र वाट पाहत आहे ! उत्खननानें प्राचीन ऐतिहासिक स्थलें व अवशेष निष्पन्न होतात, तशाच मासल्याचें, किंबहुना त्याहून जास्त बहुमोल वाङ्मय या शिलालेखांनीं उत्पन्न होणार आहे.

असे शिलालेख तयार होतांना अनेक विद्वानांचें बुद्धिसामर्थ्य खर्चीं पडतें. एखादा महाराज, महाराणी किंवा धनिक लोकोपकारार्थ मंदिर किंवा अन्य कृति उभारूं लागला, म्हणजे तो मुद्दाम तज्ज्ञ माणसें जमवून त्यांच्याकडून असे लेख बनवून घेतो. त्यांत तत्कालीन इतिहास तर पूर्णपणें समाविष्ट असतोच, पण भाषेच्या व कवित्वाच्या दृष्टीनेंहि हे लेख पुष्कळदां अत्यंत सरस असतात. कै. केतकरांनीं शातवाहनपर्वांत असे किती तरी सुंदर शिलालेख छापलेले आहेत. अशोकाच्या व खार-वेलाच्या शिलालेखांनीं आपल्या ऐतिहासिक ज्ञानांत केवढी प्रचंड भर घातली आहे तें आपण जाणतों. गुप्तांचे व चालुक्यांचे शिलालेख असेच उत्कृष्ट इतिहास बोलतात.

दिनेशचंद्र सरकार नांवाच्या बंगाली अभ्यास-कानें प्राचीन इतिहासाची महती सांगणारा संस्कृत व प्राकृत शिलालेखांचा एक भला मोठा संग्रह, कलकत्ता युनिव्हर्सिटीमार्फत प्रसिद्ध केलेला, नुकताच माझ्या पाहण्यांत आला. त्यांत मी कैक दिवस सर्वथा गुंगून गेलों ! एक नवीन ठेवाच सांपडला असें मला वाटलें ! अभ्यासकांनीं शिला-लेखांच्या या नवीन वाङ्मयाकडे जास्त लक्ष द्यावें एवढ्यासाठीं मी हें सांगत आहे आणि उदाहरणा-दाखल गौतमीपुत्र श्रीशातकर्णि याचा शिलालेख किती उच्च दर्जाचा आहे याची थोडी कथा सांगतों.

जिजाबाई व शिवाजी यांचा जो जिव्हाळा आम्हा महाराष्ट्रीयांस वाटतो, हुबेहूब तोच जिव्हाळा, शातवाहनवंशांतील महाराज्ञी गौतमी व तिचा पुत्र पराक्रमी राजा शातकर्णि यांच्या चरित्रक्रमांत उतर-लेला आहे. सर जदुनाथांनीं आपल्या ‘ शिवाजी ’-चरित्रांत पृ० २०२ वर या शिलालेखाचा संक्षिप्त उल्लेख केला आहे. सन १९४८ त प्रसिद्ध झालेली ‘ शिवाजी ’ ची चौथी आवृत्ति वाचकांनीं पाहावी.

आपल्या या महाराष्ट्रावर इसवीसनाच्या पूर्वी व नंतर सुमारें तीनशें वर्षें शातवाहन अथवा शालिवाहन वंशाचा अंमल होता. या वंशास आन्ध्र-भृत्य असेंहि नांव पुराणांत दिलेलें असून त्याचे कित्येक राजे मोठे पराक्रमी होते. त्यांची राजधानी पैठण होती. नाशिक, भाजें, कार्लें, जुन्नर इत्यादि ठिकाणीं यांचे शिलालेख सांपडलेले आहेत. गौतमी-पुत्र शातकर्णि हा एक नामांकित राजा त्या वंशांत निपजला. त्याची कारकीर्द इ० स० १०९ ते १३५ ची समजली जाते. नाशिकजवळच्या गुहेंतील लेण्यांत एक सुंदर शिलालेख प्राकृत भाषेंत लिहिलेला












प्रसिद्ध असून, त्यांत महादेवी गौतमी बलश्री हिनें बौद्ध भिक्षूंच्या सोयीसाठीं तें लेणें स्वखर्चानें दगडांत कोरून त्याच्या खर्चासाठीं एक गांव नेमून दिल्याचा त्यांत उल्लेख आहे. हें लयन म्हणजे लेणें शातकर्णीचा पुत्र पुलमावि याच्या कारकीर्दीच्या एकोणिसाव्या वर्षीं तयार झालें असा त्यांत उल्लेख आहे. "पुलमावेः संवत्सरे एकोनविंशे चैत्रशुद्धत्रयोदशदिवसे" हें वाक्य लेण्याचा काल दाखवितें. तो इ. स. १४९ येतो.

शिवाजीसारखा पराक्रमी पुत्र व त्याचें कौतुक करणारी जिजाबाईसारखी मानधन माता यांच्या कथा जशा आपणांस निरंतर रम्य वाटतात, तशाच तोडीचा जिव्हाळा शातकर्णि व त्याची मातुःश्री गौतमी बलश्री यांजमध्यें असल्याचा ठसा त्या लेखांत उमटलेला दिसतो. जिजाबाईचें एकंदर आयुष्य मोठ्या कष्टांत गेलें. पतीनें द्वितीय संबंध करून तिला दूर केलें, तेव्हां मुलगा पराक्रमी निघाला तरच काय तो तिच्या जीवनाचा आधार ! अशा स्थितींत तो पुत्र जेव्हां एकामागून एक अघटित पराक्रम करून कीर्तिघोषानें चहूंकडे गर्जू लागला, तेव्हां तर तिला आकाश ठेंगणें झाल्याचा अनुभव आला. अफजलखानाच्या भेटीस जातांना त्या उभयतांच्या अंतःकरणांत केवढी कालवाकालव चालली असेल ! आणि लगेच चार-सहा घटकांत खानाचें शिर प्रतापगडच्या बुरुजावर लटकतांना दिसलें, तेव्हां भेटींत काय प्रकार घडला तो जाणण्याची आतुरता जिजाबाईस किती झाली असेल आणि पुढें भेट झाल्यावर तिनें नाना प्रश्न विचारले त्यांचीं तपशिलवार उत्तरें किती साक्षेपानें त्यानें दिलीं असतील, तो प्रकार आपण कल्पनेनेंच जाणला पाहिजे ! शायिस्ताखानाचीं बोटें तोडलीं, सुरतेची लूट आणिली, बादशहाच्या भेटीस जाण्याचा प्रसंग आला, त्या सर्व प्रकरणांत मातापुत्रांच्या वाटाघाटी व संवाद होऊन त्यांत रात्रीच्या रात्री कशा खर्च झाल्या असतील याची आपणांस सहज कल्पना होईल. बादशहाची भेट झाल्यावर शिवाजी तेथें अटकेंत पडला. ती बातमी ऐकून जिजाबाईचें काळीज कसें तुटूं लागलें असेल आणि पुढें तीन-चार महिन्यांनीं प्रत्यक्ष शिवाजी जेव्हां बादशहाच्या कैदेंतून निसटून अकस्मात् मातुःश्रीपुढें येऊन उभा राहिला तेव्हां तिला प्रेमाश्रूंचे उमाळे कसे व किती आले असतील आणि प्रवासांतील प्रत्येक गोष्ट तिनें त्याजकडून कशी विचारून घेतली असेल तें ज्यानें त्यानें आतां मनानेंच ओळखावें. असाच रोमांचकारी प्रसंग तानाजी मालुसऱ्याच्या सिंहगडावरील मृत्यूचा. शेवटीं शिवाजीच्या सर्व कर्तबगारीवर कळस चढला राज्याभिषेकसमारंभानें ! या एकंदर प्रकरणास जगाच्या इतिहासांत तोड मिळणार नाहीं. मातापुत्रांचा प्रेमानुभव ही जगांतील अजब शक्ति असून तिचा आविष्कार वरील व्यक्तिद्वयाच्या रूपानें महाराष्ट्रास चिरंतन मिळाला हें आपलें अपरिमित भाग्य होय. जिजाबाईला तर शिवाजीच्या या कीर्तीनें जीवितसाफल्य झालेसें वाटून लगेच तिनें देह ठेवला. केवळ तो प्रसंग पाहून डोळ्यांचें पारणें फेडण्याकरितांच ती जगली, असें वाटूं लागतें.

अशाच मासल्याचा भावार्थ महादेवी गौतमी व श्रीशातकर्णि या दोन व्यक्तींच्या त्या शिलालेखांत उमटलेला पाहून भारी कौतुक वाटतें. शिवाजीसारखेच शातकर्णीचे प्रसंग एकाहून एक बहारीचे घडलेले त्यांत दिसतात. 'आपला हा पुत्र राज्य करतांना समस्त प्रजेच्या सुखदुःखांत समरस होतो, त्यानें क्षत्रियजातीला भाग्यास चढविलें, शक, यवन, पह्लव इत्यादींना जिंकून घेतलें, शातवाहनवंशाचा उद्धार केला, चातुर्वर्ण्यांतलि अनिष्ट प्रकार नाहींसे केले, अनेक भीषण संग्राम करून भूतलावर आपला कीर्तिध्वज उभारला' असें ती महादेवी गौतमी मोठ्या अभिमानानें बोलते आणि सांगते : "हा माझा पुत्र शातकर्णि सर्व विद्यांचा आधार व सत्पुरुषांचा आश्रय आहे. राम, केशव, भीम, अर्जुन यांच्यासारखा हा पराक्रमी आहे. याच्याच पराक्रमानें मला राजर्षिवधू हें अभिमानास्पद नांव मिळतें, आणि सत्यवचन, दान, क्षमा, अहिंसा अशा थोर गुणांत मला वावरतां येतें. या सर्व घटनेचें स्मरण कायम रहावें म्हणून मी महाराजमाता व महाराजपितामही हें लेणें भिक्षुसंघाला कायमचें देत आहे. त्याच्या खर्चासाठीं पैशाची पद्रक गांव नेमून दिला आहे." ही सुरम्य कथा मुळांतूनच वाचावी.








डॉ. गो. स. सरदेसाई यांचा अल्प परिचय : प्रा. त्र्यं. शं. शेजवलकर

# आगामी भारतीय इतिहासपरिषदेचे नियोजित अध्यक्ष

महाराष्ट्र इतर कोणत्याहि बाबतींत मागें पडलेला असो, पण एका विषयांत तो मागें नाहीं ही गोष्ट भारतीय इतिहास-परिषदेला चौदा वर्षांत दोन अध्यक्ष पुरवून त्यानें सिद्ध केली आहे. इतिहासाचे राजकारणी संशोधक दत्तोपंत पोतदार तीन वर्षांपूर्वी अध्यक्ष झाले, तर इतिहासाचा समग्र भार शेषाप्रमाणें शिरावर पेलणारे रियासतकार सरदेसाई यंदाच्या जयपूर-परिषदेचे अध्यक्ष होत आहेत. काळाएवढा निवड करणारा दुसरा नाहीं. उपरिनिर्दिष्ट दोघां पुरुषांतील इतिहासविषयक वाद इतिहासजमा झाले असून संशोधकानंतर का होईना, आतां 'संकलनकार'सुद्धां एकाच मानाच्या पदाला लायक ठरत आहेत. ससा आणि कासव यांची इसापनीतींतील गोष्ट अशा रीतीनें पुन्हां एकदा बोधपर ठरत आहे. धिम्मेपणानें नित्य कार्य करणारा कमी वेगाचा माणूसहि ध्येयाप्रत पोंचूं शकतो. मात्र त्याला योग्य काळ येईपर्यंत वाट पाहावी लागते. राजपुत्रशिक्षकाचें काम चोख बजावण्याच्या हेतूनें ज्या विस्तृत टिप्पणी पंचावन वर्षांपूर्वी लिहिल्या गेल्या त्यांनीं रियासतींचा पाया घातला. समाजाला ज्या वेळीं जें हवें होतें तें पुरविलें गेल्याकारणानें त्यांचा खपहि झाला. प्रसाराबरोबर नांवलौकिक मागोमाग आला. रियासतींची संशोधिलेली आवृत्ति निघण्यापूर्वीच राजवाड्यांनीं रियासतकारांची शतकांतील शंभर नामांकित महाराष्ट्रियांत गणना केली. संशोधित पुनरावृत्ति पुढें आल्यावर त्यांनीं सरदेसायांना 'इतिहासमार्तंड' म्हणून संबोधिलें. साने, राजवाडे, पारसनीस, खरेप्रभृति संशोधकांचीं रद्दींतून निवडलेलीं चिटोरीं कोंदणांत बसून रत्नें ठरलीं. सरदेसायांचें नांव महाराष्ट्र-इतिहासपंचायतनांत कायमचें दाखल झालें. पण भारतीय इतिहास-परिषदेचें अध्यक्षपद लाभण्यास व अशा रीतीनें भारतीय पंडितांची मान्यता जाहीरपणें मिळण्यास त्यांना ८७ वें वर्ष लागावें लागलें !

सरदेसायांचा जन्म १७ मे १८६५ चा. त्यांचें गांव गोविल हें अगदीं खेडें. मराठी शिक्षण जवळच्या मामांच्या शिपोशी गांवीं झालें. इंग्रजी शिक्षण रत्नागिरी हायस्कुलांत झालें. तेथें त्या वेळीं कीर्तने नांवाचे ॲसिस्टंट मास्तर होते. त्यांनीं हा नामांकित कुळांतला देखणा मुलगा पाहून त्याला आपली मुलगी दिली व त्यांच्याचमुळें सरदेसाई पुण्यास मॅट्रिक पास झाल्यानंतर फर्ग्युसन कॉलेजांत दाखल झाले. कॉलेजचें तें पहिलें वर्ष व शिक्षक टिळक-आगरकरांसारखे ! साहजिकच संस्कारक्षम मनावर या गुरुंच्या उपदेशाचा इष्ट तो परिणाम झाला. कॉलेज या वेळीं आप्पा बळवंत चौकांतील गद्रेवाड्यांत भरत असे. समोरच मोरोबादादांचा वाडा. शनिवारवाडा येथून तीन मिनिटांच्या रस्त्यावर. अशा वातावरणांत तशा गुरुंच्या हाताखालीं एक वर्ष राहूनच सरदेसायांना त्यांच्या आयुष्याची गुरुकिल्ली मिळाली. कुल थोर असलें तरी त्याबरोबर श्रीमंती त्यांच्या वांट्यास आलेली नव्हती. वडील कर्जबाजारीच होते. त्यांत गोविंदराव हे सर्वांत वडील चिरंजीव. कुलाकडून त्यांना मिळालेली श्रीमंती, उत्तम प्रकृति व दीर्घायुष्य यांची होय. टिळक-आगरकरांपासून ते अविश्रान्त उद्योग, विद्याभिरुचि व देशकार्यासाठीं कोणत्या तरी बाजूनें झटणें या गोष्टी शिकले. त्यांच्या आयुष्याचें एकमेव कार्य ठरलेल्या इतिहासविषयाचें








काम, त्यांनीं आपला देशकार्यांतील वांटा या भावनेनें केलें आहे.

### राष्ट्रोपयोगी राजनिष्ठा

सरदेसायांचें पुढील शिक्षण मुंबईस एल्फिन्स्टन् कॉलेजांत झालें. सन १८८८ सालीं बी. ए. झाल्यानंतर ते पुढें काय करावें या विचारांत असतां शिपोशीचे बापूसाहेब आठल्ये बडोद्यास त्या वेळीं नायब दिवाण होते, त्यांनीं गोविंदरावांना तिकडे नेलें व तरुण महाराज सयाजीराव यांचे वाचक म्हणून त्यांची पहिली नेमणूक झाली. युवराज फत्तेसिंहराव शाळेंत जाण्यायोग्य झाले तेव्हां सरदेसायांची राजपुत्रविद्यालयांत शिक्षक म्हणून योजना झाली. विद्यालयाचे मुख्य अर्थातच त्या काळानुरूप युरोपीय होते. सरदेसायांना आरंभापासून अखेरपर्यंत दुसऱ्याच्या हाताखालीं काम करावें लागलें आहे, कारण सयाजीराव महाराजांची रीत दक्षिणी ब्राह्मणाला मुख्य करण्याची सहसा नव्हती. मुख्य इंग्रज, ख्रिस्ती, मुसलमान, बंगाली, मद्रासी, गुजराती किंवा मराठा कोणीहि असेल, दक्षिणी ब्राह्मण दुय्यम पदावरच असावयाचा. ही गोष्ट येथें मुद्दाम सांगण्याचें कारण असें कीं, याचा दुष्परिणाम ब्राह्मण आणि मराठे यांचे परस्परसंबंध दुरावण्यांत झालेला आहे व याचाच ऐतिहासिक परिपाक काँग्रेस राजवटींत मराठ्यांचीं पहिल्या दर्जाचीं संस्थानें दूरदृष्टि, शहाणपणा व मुत्सद्देगिरी यांच्या शोचनीय अभावामुळें एका फटकाऱ्यांत निकालांत निघण्यांत दृष्टोत्पत्तीस येत आहे. तें कसेंहि असलें तरी, वैयक्तिक दृष्ट्या सरदेसायांना मराठ्यांच्या ऐतिहासिक परंपरेशीं, चालीरीतींशीं व अभिमानाशीं संबंध आल्यामुळें फायदाच झालेला आहे. त्यांत महाराज सयाजीराव हे विद्याभिलाषी, शिस्तीचे भोक्ते व नोकरांकडून चोपून काम करून घेण्यांत वाकबगार असल्यामुळें त्यांच्या या गुणांचाहि सरदेसायांच्या कार्यावर चिरंतन असा इष्ट परिणाम झाला आहे. बडोदें संस्थान हें कांहीं बाबतींत विशेषतः शिक्षण, कला, विद्या व सामाजिक सुधारणा यांत ब्रिटिश राज्याच्याहि पुढें होतें. त्यांतील इंग्रजांचा दीर्घ उद्योग व पद्धतशीर व शिस्तवार काम करण्याचा अमोलिक गुण सयाजीरावांच्या मास्तरकीमुळें सरदेसायांत पुरेपूर उतरला. याचेंच दुर्मिळ फळ सरदेसायांचा साठ वर्षें चाललेला इतिहासोद्योग हें होय. सयाजीरावांच्याबरोबर सरदेसाई अनेकदां विलायतेस गेले व एक सहामाही ते ऑक्सफर्डमधील एका कॉलेजांत व्याख्यानेंहि ऐकत होते. याहि देशाटनाचा व इंग्रजांच्या कार्यांचें जवळून अवलोकन घडण्याचा त्यांना मोठा फायदा झाला. सयाजीरावांजवळ लहान मोठे अनेक पदवीसंपन्न, हुशार व मोठे अधिकारी होते. पण त्यांपैकीं कोणीहि सरदेसायांप्रमाणें मिळालेल्या संधीचा उत्तम उपयोग करून घेतला नाहीं. याचें दुसरें एक कारण असें कीं, सरदेसाई हे निर्लोभी असल्यामुळें पैसा मिळविण्याकडे असें स्वतंत्र लक्ष देण्यांत त्यांनीं एक क्षणहि मोडलेला नाहीं. जें सहजरीत्या मिळेल त्यावर संतुष्ट राहून कोणतीहि तक्रार न करतां इमानेंइतबारें चोख काम बजावावयाचें असा त्यांचा स्वभाव आहे. राजनिष्ठा म्हणजे काय व त्याचा समाजधारणेला व राष्ट्राला केवढा मोठा उपयोग आहे, हें सरदेसायांच्या आयुष्यावरून समजतें.

### 'मनस्वी, कार्यार्थी'

प्रथम विलायतेहून आले तेव्हां सरदेसायांना त्या काळाप्रमाणें प्रायश्चित्त घ्यावें लागलें व बापूसाहेब आठल्ये यांनीं शंकराचार्यांकडून आज्ञापत्र आणवून तें जाहीरहि केलें. याबाबतचा पत्रव्यवहार त्या वेळच्या 'केसरी'त विस्तारानें छापला आहे. पण पुढें बापूसाहेब निवर्तले व या प्रकाराला हळूहळू खंड पडला. सरदेसाई हे घराण्यानें व परंपरेनें ब्राह्मणापेक्षां जास्त क्षत्रिय आहेत. सयाजीरावांच्या तालमींत ते समाजसुधारकहि झाले व पुढच्या आयुष्यांत त्यांची ऊठबस सर्व धर्मांच्या व जातींच्या लोकांत निःसंकोचपणें होत असे. राजकीय बाबतींत टिळकांचे अभिमानी असणारे सरदेसाई सामाजिक बाबतींत आगरकर–कर्वेप्रभृतींचे अनुयायी व सहकारी ठरले. त्यांचें पहिलें पुस्तक प्रो. सीलीच्या 'इंग्लंडचा विस्तार' या पुस्तकाचें भाषान्तर होय. यानंतर त्यांनीं महाराजांच्या आज्ञेनें सहा पाश्चात्त्य खेळांच्या पुस्तकांचीं भाषान्तरें केलीं. नंतर राजपुत्रांना शिकविण्यासाठीं इंग्रजी इतिहासाच्या पुस्तकांतून विस्तृत मराठी टिपणी जवळजवळ भाषान्तररूप काढल्या. त्या त्यांचे नातेवाईक धनु-



अनुक्रमणिका






घोरी टिकेकर यांच्या नजरेस पडल्या व त्यांनीं त्या ग्रंथरूपानें प्रसिद्ध करण्याचा आग्रह केला. १८९८ सालीं प्रसिद्ध झालेल्या या मुसलमानी रियासतीनें त्यांच्या आयुष्याचें कार्य निश्चित झालें. नंतर चार वर्षांनीं मराठी रियासत ( पूर्वार्ध ) व तदनंतर सहा वर्षांनीं ब्रिटिश रियासत ( पूर्वार्ध ) हे प्रसिद्ध झाले. १९०० सालीं त्यांनीं विद्यार्थ्यांसाठीं शालोपयोगी 'भारतवर्ष' हा छोटा इतिहास प्रसिद्ध केला. त्या काळाच्या मानानें हीं सर्व पुस्तकें देशभक्तीच्या प्रेरणेनें लिहिलेलीं आढळतील. त्यांनीं अनेक तरुणांना हिंदुस्थानच्या इतिहासाची गोडी व देशभक्ति यांचें बाळकडू पाजलें आहे. बडोद्याच्या 'राष्ट्रकथा-माले'त त्यांनीं ग्रीसच्या इतिहासाचें पुष्प गुंफिलें. या कार्यामुळें त्यांचा परिचय राजवाडे-पारसनीस-प्रभृति संशोधकांशीं व यदुनाथ सरकार यांसारख्या अव्वल दर्जाच्या इतिहासकाराशीं सहजच झाला. राजवाड्यांनीं ओकांच्या 'लोकशिक्षणां'त लेख लिहून महाराष्ट्रांतील बुद्धिमान्, प्रतिभावान् व कर्त्या लोकांची जी मोजदाद केली त्यांत त्यांनीं गोविंद-रावांचेंहि नांव समाविष्ट केलें, एवढी त्यांच्या देशोपकारक कार्याची समाजावर छाप पडली होती, हें आरंभीं उल्लेखिलेलेंच आहे. प्रसिद्धीबरोबर व गुणग्रहणामुळें आपलें कार्य नुसतें उपयुक्त न ठेवतां विद्वन्मान्य करण्याकडे सरदेसायांची प्रवृत्ति झाली. मराठी रियासतीच्या पूर्वार्धाची दुसरी आवृत्ति १९१५ सालीं राजवाडे-साने-पारसनीसप्रभृति संशोधकांच्या कार्याचा संपूर्ण समावेश करून काढण्यांत आली. या काळांत त्यांच्या हातून 'मासिक मनोरंजन' प्रभृति नियतकालिकांत सामाजिक विषयावर लिखाणहि बरेंच झालें आहे. त्यावरून ते समाजाच्या किती पुढें होते तें कळून येतें.

हें सर्व चालू असतां वडील भाऊ या नात्यानें कुटुंबाचा बराच भार त्यांच्यावरच पडत असे. सरदेसाई घराण्याची प्रवृत्ति नवीं क्षेत्रें शोधून बिन-स्पर्धेच्या मार्गानें स्वतःचा भाग्योदय करून घेण्याची आहे. वडील भाऊ बी. ए. झाला म्हणून धाकटाहि त्याच मार्गानें न जातां कलाभवनाचा पहिला विद्यार्थी होऊन गिरणींत शिरला. तिसरा व्यापारी झाला, चौथा नेत्रवैद्य झाला, पांचवा विणकामांत तज्ज्ञ झाला. या सर्वांनीं कमीजास्त प्रमाणांत आपापल्या क्षेत्रांत यश मिळविलें. मुलगा श्यामकांत बापाप्रमाणें इतिहासकार होण्याच्या नादास न लागतां रसायनशास्त्रांतच प्रवीण झाला होता. त्यामुळें त्यांच्या घरांत एकांगीपणा वा एकजिनसी-पणा कधीं शिरलाच नाहीं. श्यामकान्ताला त्यांनीं शिकण्यासाठीं रवींद्रनाथांच्या शांतिनिकेतनांत पाठ-विलें होतें. धाडस हा सर्वांचा उपजत गुण. भित्रे-पणा त्यांच्या आड येऊं शकला नाहीं. मनस्वी आणि कार्यार्थी असें या घराण्याचें वर्णन करतां येईल. सरदेसायांच्या कार्यांतील अर्धें श्रेय सर्व बाजूंनीं विचार करतां त्यांच्या पत्नीस व कुटुंबास द्यावें लागेल.

## इतिहास हाच पुत्र

सरदेसायांचा प्रवेश मराठ्यांच्या इतिहासांत व त्याच्या साधनरूप संभारांत जसजसा होत गेला व त्याचा विस्तार वाढत असलेला त्यांच्या निदर्शना-स आला, तेव्हां त्यांनीं एका उत्तरार्धांत सबंध पेशवाई सांगण्याचा विचार सोडून मध्यविभाग सुरू केला. पण त्याचेहि चार विभाग करावे लागले. हे भाग १९२० पासून १९२५ पर्यंत क्रमशः प्रसिद्ध झाले स्नेह्यांनीं प्रथम विभागांतील दोष दाखविले, तेव्हां चुकीचा इतिहास लोकांसमोर ठेवणें बरें नव्हे हें पटून त्यांनीं त्याची सुधारलेली दुसरी आवृत्ति प्रसिद्ध केली. सरदेसायांना या उद्योगांत फारशी प्राप्ति झालेली नाहीं. ते काटकसरी व व्यवहारी असल्यामुळें त्यांनीं आपलीं पुस्तकें 'सयाजी साहित्यमाले'च्या पुष्परूपानें मदतीनें प्रसिद्ध करून घेतलीं. छापखान्यासाठीं भरमसाट खर्च करणें व त्यामुळें पुस्तकांच्या किंमती गरीब महाराष्ट्राच्या ऐपतीबाहेर ठेवणें त्यांस बिलकुल मंजूर नव्हतें. आप्पा पटवर्धन यांनीं गांधींच्या काटकसरीचें वर्णन केलें आहे त्याच जातीची सरदेसायांची, इंग्रजी म्हणीप्रमाणें 'वृथा खर्च केला नाहीं म्हणजे गरजेची बाधाहि होत नाहीं' अशी वर्तणूक आहे. याच सुमारास त्यांचा उरलेला एकमेव वडील मुलगा श्यामकान्त पीएच्. डी. झाल्यावर क्षय होऊन स्वित्झर्लंडांत मरण पावला. वडिलांचे त्यासाठीं हजारों रुपये शिक्षणासाठीं व रोगशुश्रूषेंत खर्च

झाले व पुन्हां वृद्धपणीं पतिपत्नींना एकाकी जीवन कंठण्याचा प्रसंग ओढवला. गोविंदराव धैर्यवान् होते म्हणूनच ह्या काळाच्या झपाट्यांतून ते बाहेर पडले. अतःपर इतिहास हाच त्यांनीं आपला पुत्र मानला. या पुत्राच्या लालनपालनांत अंतरींचें दुःख नष्ट न झालें तरी शांतीचा लाभ त्यांना झालेला आहे.

पण सरदेसायांना शांत, स्वस्थ, गप्प बसणें स्वभावतःच शक्य नाहीं. त्यांची अखंड चालणा स्थल, काल, परिस्थिति यांना न जुमानतां अविरत चालू असते. हाच या पुरुषाचा विशेष होय. सरदेसायांनीं अनेक नाद लावून घेतलेले नाहींत, किंवा त्यांना ते लागलेले नाहींत असेंहि म्हणतां येईल. रिकामें मन सैतानाचें खेळणें बनतें हें ओळखून सरदेसाई सदासर्वदा कोणत्या ना कोणत्या कामात गुंतून रहातात. गप्पा किंवा सामाजिक करमणुकींत ते वृथा कालक्षेप करीत नाहींत. त्यांच्या वैयक्तिक संवयी अगदीं साध्या कोंकणांतील राहिल्या आहेत. ते चहा पितात पण त्यानंतर तब्बल काम करतात. त्यामुळें त्याच्या प्रकृतीवर दुष्परिणाम बिलकुल दिसत नाहींत. डोंगर चढणें, लांकडें फोडणें व पोहणें यांसारखे व्यायाम ते ऐंशीं वर्षांनंतरहि करीत असत. पण अलीकडे दोन मोठे आजार व शस्त्रक्रिया झाल्यामुळें डॉक्टरांच्या सल्ल्यानें ते व्यायाम बंद आहेत. खाण्यापिण्याच्या विचारांत सरदेसायांचा कधींच वेळ मोडलेला नाहीं. पदार्थ चांगला लागला तरी तो ते जास्त खातील असें घडावयाचें नाहीं. त्यांचें पोट सुखासीनपणामुळें कधींच वाढलें नाहीं, त्यामुळें ते आजहि झपाझप उठतात, बसतात, चालतात व काम करतात. मितपणाचे सर्व फायदे त्यांना मिळालेले आहेत. वैयक्तिक बाबतींत सरदेसाई हे विद्यार्थीनीं आदर्श म्हणून पुढें ठेवण्यासारखे पुरुष आहेत.

सरदेसायांच्या स्वभावांतील क्षात्रवृत्ति शिवजन्मतिथीच्या वादांत निदर्शनास आली. १६२७ हें साल जन्मवर्ष मानून त्यांनीं त्याचा त्रिशतसांवत्सरिकोत्सव घडवून आणला. त्यासाठीं दोन संस्मरणग्रंथहि स्वतः संपादून प्रसिद्ध केले. मुख्यतः हा उत्सव मुंबईसच गाजला. इतर ठिकाणीं १६३० ची नवीन तिथि धरून 'भारत-इतिहास-मंडळा'तर्फे त्रिशतसांवत्सरिकोत्सव साजरा झाला व त्यानिमित्त शिवकालीन पत्रसारसंग्रह, निबंधावलि व चरित्रसाहित्य प्रसिद्ध करण्यांत आलीं. अजूनहि मराठ्यांच्या तर्फे होणारा उत्सव जुन्या तिथीलाच होतो, पण बहुतेक इतिहास-संशोधक नवी तिथीच खरी असें मानतात व त्याला भरभक्कम पुरावाहि मिळालेला आहे. पुणेकरांच्या अहंभावात्मक दडपेगिरीमुळें हा वाद बराच चिघळला होता व त्यांत लेखालेखी बरीच झाली व गाजली. पण सरदेसाई व त्यांचे इंग्रजींतील सहकारी सर यदुनाथ सरकार हे आजतागायत १६२७ तिथीलाच चिकटून राहिले आहेत. मात्र, ते आतां दुसरी तिथीहि उल्लेखिल्याशिवाय राहूं शकत नाहींत. आमच्या मतें अशी गोष्ट त्यांनीं करणें योग्य नव्हे. पण याबाबत 'स्वभावो दुरतिक्रमः' हाच अनुभव येत आहे. सरदेसायांच्या स्वभावाची दुसरी बाजू म्हणून हा उल्लेख येथें केला आहे.

### लोक शहाणे करण्याचा रामदासी हव्यास

सरदेसायांचे सन्मित्र यदुनाथ सरकार—ज्यांचें सहकार्य एकमेकांच्या इतिहासलेखनाला सुदैवानें पूरक ठरलें आहे—या सुमारास पटण्यास होते. तेथील नव्या विश्वविद्यालयाकडून सरदेसायांना १९२६ सालीं मराठ्यांच्याइतिहासावर व्याख्यानें देण्यासाठीं निमंत्रण आलें. या व्याख्यानांत त्यांनीं मराठ्यांच्या इतिहासाच्या सिंहावलोकनाबरोबर इकडील संशोधकांच्या कार्याचाहि उल्लेख करून आढावा घेतला आहे. या छापील इंग्रजी व्याख्यानांमुळें परप्रांतीयांना महाराष्ट्रांतील एतद्विषयक प्रचंड कार्याची माहिती झाली. सुबोधपणा हा सरदेसायांच्या लिहिण्यांतील प्रधान गुण. वाचक कोठेंहि अडावयाचा नाहीं, अशीच त्यांची लेखनसरणी आहे. यानंतर ते 'भारतीय इतिहाससाधनसमिती'चे सरकारनियुक्त सभासद नेमले गेले. त्यासाठीं ते एकदां रंगूनलाहि जाऊन आले, कारण त्या वेळीं ब्रह्मदेश हा हिंदी साम्राज्याचा भाग होता. पण सरदेसायांचा स्वभाव समूहांत काम करण्याचा नाहीं. आपण बरें, आपलें काम बरें, अशा वैयक्तिक ठेवणीचा तो आहे. शुष्क वादविवाद वा शब्दांचा कीस काढीत बसणें त्यांना आवडत नाहीं. हाहि स्वभाव त्यांच्या क्षात्रवृत्तीला साजेसा आहे. हुकूम व नियम बिनबोभाट



अनुक्रमणिका

# आगामी भारतीय इतिहासपरिषदेचे नियोजित अध्यक्ष

पाळणें व त्याची तामिली करण्यासाठीं झटणें हे त्यांचे विशेष आहेत. एकाद्या दूरच्या गांवास पोंचण्यासाठीं निघालेला जासूद ज्याप्रमाणें झपाझप नित्य मार्गक्रमण करीत असतो, त्याप्रमाणें आपलें नियोजित कार्य ते करीत असतात. १९२९ व १९३२ सालीं मिळून उत्तरार्धाचे तीन खंड प्रसिद्ध करून एकंदर आठ विभागांत तीन वर्षांनीं त्यांनीं आपली मराठी रियासत पूर्ण केली. पण याच वेळीं ते पेशवे दप्तरांतून कागद निवडून व नकलून छापून प्रसिद्ध करण्याच्या कामावर नेमले गेले व तें काम त्यांनीं ७८०० पृष्ठें पत्रव्यवहार छापून पंचेचाळीस भागांत पूर्ण केलें. इतक्या नेटानें व झपाट्यानें चार वर्षांत काम करून दाखविणें इतर कोणाच्या हातून तडीस गेलें असतें असें वाटत नाहीं. त्यांच्या अधिकारी दट्ट्याच्या जोरामुळें तें शक्य झालें. त्यांना या कामासाठीं हाताखालीं नेमून देण्यांत आलेले लोक, एखादा अपवाद वगळून, बरेचसे नवशिके व अप्रवीण होते. त्यांतील कांहीं सरदेसायांच्या विरुद्धपक्षाचे व उणेपणा पाहाण्यास टपलेलेहि होते. या पत्रांच्या संपादनांत म्हणजे विशेषतः जुळणींत व तारीखवार लावण्यांत ज्या बऱ्याच चुका झालेल्या आहेत, त्यांचें खापर सरदेसायांवर फोडणें असमंजसपणाचें आहे. त्याबाबतचा दोष बहुधा त्या सरकार-नियुक्त सहकाऱ्यांवरच ठेवावा लागेल. सरदेसायांचा दोष असला तर इतकाच कीं, तें पुष्कळ काम नियोजित मुदतींत उठवून हातावेगळें करण्यास उत्सुक झाले होते. त्यांनीं स्वतः सावकाशीनें काम केलें असतें तर बहुतेक चुका त्यांच्या त्यांनींच दुरुस्त केल्या असत्या. पण नवानवसानें कधीं न मिळणारी संधि चालून आली तर ती विचक्षणेंत घालवून काम लोळत ठेवण्याचा त्यांचा स्वभाव नव्हता आणि यामुळेंच त्यांना टीकांचे धनी व्हावें लागलें आहे.

सत्तरीच्या घरांत आल्यानंतर सरदेसायांनीं रियासतींची चारित्ररूप तिसरी आवृत्ति प्रसिद्ध करण्यास सुरुवात करून अर्धें अधिक काम पुरेंहि केलें आहे. पेशवे-दप्तराचा पुढचा भाग इंग्रजी रेसिडेंटांच्या पत्रव्यवहाराचा. तो संपादून प्रसिद्ध करविण्यांत त्यांनीं मोठा वांटा उचललेला आहे. शालोपयोगी पुस्तकें लिहिण्यांतहि त्यांनीं आळस केलेला नाहीं. आपल्या जवळ दुसऱ्यास देण्यासारखें जें जें कांहीं आहे तें देऊन टाकून लोक शहाणे करण्याचा त्यांना रामदासी हव्यास आहे. कोणीं लेख मागितला तर नाहीं म्हणणें त्यांच्या जिवावर येतें. सर यदुनाथप्रभृति त्यांच्या चहात्या मित्रांनीं सन १९३८ सालीं त्यांना इंग्रजी-मराठी दोन संस्मरण-ग्रंथ ना. जयकर यांच्या अध्यक्षतेखालीं समर्पण करून त्यांचा मोठा गौरव केला. सरकारनें त्यांना 'रावबहादुर' केलें. विश्वविद्यालयांनीं त्यांना परीक्षक नेमलें. नागपूर विश्वविद्यालयानें त्यांना मराठींत व्याख्यानें देण्यास पाचारून तीं छापविलीं.

ऐंशीच्या दारांत आल्यानंतर त्यांचीं साठ वर्षें सहकारी म्हणून वागलेली पत्नी निवर्तली. त्यामुळें त्यांच्या जीवनाला साहजिकच एक प्रकारचा एकाकीपणा आला आहे. पण दैवाच्या निकालावर हुजत घालणारे ते नाहींत. आजहि कांहीं ना कांहीं करण्याच्या विचारानेंच वागतांना ते आढळतात. कार्यावर एवढा विश्वास असणारे पुरुष थोडे.

त्यांच्या कर्तव्यनिष्ठेचें एक ताजें उदाहरण नुकतेंच ऐकिलें. येत्या नाताळांत जयपूरच्या इतिहास-परिषदेंत त्यांना अध्यक्ष म्हणून जें वक्तव्य करावें लागणार त्याचें लेखन त्यांनीं मे अखेरीस संपवून टाकलें! त्यानंतर त्यांच्यावर दोन कठिण शस्त्रक्रिया करण्यांत आल्या व त्यांतून बरे होऊन पुनः कामाला लागण्याच्या मार्गावर ते या वयांतहि आहेत.

सरदेसायांच्या कामाचें महत्त्व व कौतुक अशासाठीं वाटतें कीं, हें सर्व प्रचंड कार्य तल्लख बुद्धीची ईश्वरी देणगी न मिळालेल्या व सरस्वतीची फारशी कृपा नसलेल्या व्यक्तीकडून पार पडलें आहे. इष्ट कार्यासाठीं वाटेल ते परिश्रम करण्याची तयारी हेंच प्रतिभावानाचें मुख्य लक्षण कार्लाइल मानतो, तें सरदेसायांच्या उदाहरणानें खरें ठरतें.

अशा महाराष्ट्राच्या सुपुत्राला यंदांच नूतन पुणें विद्यापीठानें डॉक्टरेटची पदवी दिली व इतिहास-परिषदेनें अध्यक्ष निवडलें तर तो सरदेसायांच्या-बरोबर त्या संस्थांचाहि गौरव मानला पाहिजे. आणि महाराष्ट्राचा सन्मानहि त्यांत होत आहे हें विशेष.

---



अनुक्रमणिका






डॉ. ॲलेक्सिस् कॅरेल : अनु.–ना. ग. जोशी

# प्रार्थनेचा चमत्कार !

[ मि. ॲलेक्सिस् कॅरेल हे नामवंत वैद्यकशास्त्रज्ञ होते. त्यांना १९१२ सालीं त्या विषयाचें नोबेल पारितोषिकहि मिळालेलें होतें. 'मॅन् दि अनूनोन' नांवाचा मानवविषयक संशोधन-संकलनात्मक एक अत्यंत विचारप्रवर्तक ग्रंथ त्यांनीं लिहिलेला जगत्प्रसिद्ध आहे. त्या पुस्तकांत त्यांनीं एक प्रकरण असें लिहिलें आहे कीं, ज्यांत प्रार्थनांचा परिणाम वगैरेची शास्त्रदृष्टीनें निर्विवाद अशी माहिती दिली असून, त्याचें स्पष्टीकरण मात्र आजच्या शास्त्रीय ज्ञानाला देतां येत नाहीं असें म्हटलें आहे. मानवी व्यक्तित्वाचा हा 'अज्ञात' कप्पा इतर अनेक अज्ञात गोष्टींपैकींच एक आहे व शास्त्रज्ञांनीं अशा गोष्टीहि विचारांत घेऊन त्यांचें संशोधन केलें पाहिजे असें ते शास्त्रीय दृष्टीनें म्हणतात. हें पुस्तक १९३६ च्या सुमारास लिहिलें गेलें. पण तत्पूर्वी अनेक वर्षें डॉ. कॅरेल समग्र मानवी व्यक्तित्वाचा संकलनात्मक विचार व संशोधन करीत होते. अशा संशोधनांपैकींच १९०३ मधील पिरिनीज पर्वतांतील लूर्द ( Lourdes ) या ठिकाणची त्यांची सफर आहे. त्या सफरीचा वृत्तान्त त्यांनीं लिहून ठेवलेला, त्यांच्या कागदपत्रांत सांपडलेल्या एका पुस्तिकेंत नुकताच उपलब्ध झाला. सर्व तऱ्हेच्या अनुभवांसाठीं सिद्ध असलेल्या या महान् शास्त्रज्ञाला त्याच्या जीवनांतील अत्यंत गूढ असा 'अतिभौतिक' अनुभव या वेळीं आला. या पुस्तिकेचें नांव "दि व्हॉयेज टु लूर्द" असें असून त्यांतील ( संशोधक ) डॉक्टरचें नांव डॉ. लेरॅक ( Dr. Lerrac ) हें त्यांच्या स्वतःच्या Carrel नांवाचेंच उलटें रूप आहे. या पुस्तिकेंतील अनुभवाचा वृत्तान्त येथें संक्षेपानें दिला आहे. ]

गाडीच्या एंजिननें शिटी फुंकली. निस्तेज, क्षीण चेहरे गाडीच्या खिडक्यांबाहेर पाहूं लागले आणि पांढऱ्या वेशांतील परिचारिकांनीं हात बाहेर काढून रुमाल हलवले. हळूहळू गाडी स्टेशन-बाहेर पडून दक्षिणेकडे चालली. भयंकर उन्हाळा होत होता. मेमधील शेवटचे दिवस होते ते. पाद्री ॲबे बी. यांच्या आमंत्रणावरून तरुण डॉ. लेरॅक हे त्या यात्रेकरूंच्या मेळ्याबरोबर वैद्यकीय मदतीसाठीं चालले होते.

गाडींत रुग्णाईत यात्रेकरू होते. ते फ्रान्सच्या दक्षिणेस पिरिनिजमध्यें असलेल्या लूर्द मुक्कामीं चालले होते. ॲबे बी. हे त्यांच्याबद्दल स्वाभाविक-च चिंताग्रस्त होते.

"लूर्दची ही माझी पंचविसावी यात्रा आहे." ते डॉ. लेरॅकला म्हणाले. "पवित्र कुमारी मेरी हिचा प्रसाद आम्हांला नेहमीं लाभला आहे. ३०० रोग्यांपैकीं निदान ५०–६० रोग्यांना तरी आपण बरें झालों, असें नेहमीं वाटलें आहे."

"पण बरें व्हायच्या आशेनें जे जातात, पण तसें न घडल्यानें ह्या प्रवासाच्या यातना ज्यांना व्यर्थ सोसाव्या लागल्याशा वाटतात, त्यांच्याबद्दल काय ?" लेरॅकनें त्यांना विचारलें.

"श्रद्धा नसल्यासारखें आपण बोलतां, डॉक्टर," ॲबे बी. म्हणाले, "जे जातात पण बरे होत नाहींत त्यांना धीर तरी नक्कीच लाभतो आणि घरीं परतल्यावर जरी ते वारले तरीहि त्यांना समाधान वाटत असतें."

डॉ. लेरॅक रोग्यांच्या रोगांचीं इतिवृत्तें वाचीत



अनुक्रमणिका






होते. लूर्दच्या झऱ्यांतील पवित्र पाण्याच्या स्पर्शानें रोग बरे होत असल्याचे चमत्कार ऐकून तेथें जाऊन काय तें पाहण्याची त्यांना इच्छा होती. या वेळीं ती संधि अनायासें आली. आतां या गोष्टीचा अधिकृत रीतीनें छडा लावणें त्यांना शक्य होतें.

अशा तऱ्हेच्या चमत्काराची माहिती जीव-शास्त्रज्ञांना तरी जवळजवळ मुळींच नव्हती. जेथें शास्त्रनियमच नीटसे समजले असें मानतां येत नाहीं तेथें त्यांच्या आधारानें असलें कांहींहि संभवनीय नाहीं, असें म्हणणें कठिण होतें. या चमत्कारांचें अस्तित्व नाकारणें शक्य नव्हतें. लूर्दसारख्या ठिकाणीं जे चमत्कार घडतात म्हणून बोललें जात होतें त्यांचें निरीक्षण व परीक्षण तटस्थ व वस्तुनिष्ठ दृष्टीनें करणें आवश्यक होतें. या रोगनिवारणाचा असा पद्धतशीर अभ्यास कोणीं केलेला नव्हता. तेव्हां लेरॅकनें तेथें जायचें ठरविलें. हे रोगनिवारणाचे चमत्कार केवळ काल्पनिक ठरले तरी त्याकरितां वेळ फारसा जाणार नव्हता. पण जर त्यांतून कांहीं निश्चित परिणाम घडतांना दिसले, तर ते कशा-मुळें घडतात हें सांगतां आलें नाहीं तरी, घडलेल्या घटना शास्त्रीय दृष्टीनें नमूद करणें ही गोष्टहि मोठी आकर्षक ठरणार होती !

दुसऱ्या एका पाद्र्यानें डॉ. लेरॅकला म्हटलें, " या रोग्यांत एक बाई आहे. तिच्याकडे खास लक्ष द्यायला सांगितलेलें आहे. आपण जर तिला ताब्यांत घ्याल तर फार उपकार होतील. ती इतकी अशक्त आहे कीं तिचें कांहीं बरेंवाईट तर नाहीं ना होणार, अशी मला भीति वाटते. "

पुढच्या स्टेशनवर डॉ. लेरॅक त्या बाईकडे गेले. तरुण मुलगी होती ती. तोंड ओढलेलें आणि फिक्कट. ती चटईवर पडून होती. तिचें नांव होतें मेरी फेरान्द. डॉक्टरला पाहून ती म्हणाली, " मला फार त्रास होतोय्. पण मी आलें याचेंच मला फार समाधान आहे. इस्पितळांतील सिस्टर्स मला येऊं द्यायला तयारच नव्हत्या. " " फारच बरें वाटत नाहींसें झाल्यास एक इन्जेक्शन देईन " असें सांगून डॉ. लेरॅक तेथून निघाले.

" तुमच्या रोगी बाईची स्थिति फारशी आशा-दायक नाहीं. प्रवासांत कोणी वारलें तर तुम्ही काय करतां ? " असें त्यांनीं त्या पाद्रींना विचारलें. पाद्रींनीं उत्तर दिलें, " असें बहुधा घडत नाहीं. पण घडलेंच तर शव पुढच्या स्टेशनवर उतरून टाकायचें. फारच सोपें काम आहे हें ! "

दुसऱ्या दिवशींची रात्र तर संपतां संपेना. भयंकर उकाडा, श्वास घ्यायला हवा मिळेना इतकी गर्दी. रोग्यांचे प्राण तर व्याकूळ होत होते. त्या रोगी बाईची देखरेख करणारी नर्स डॉ. लेरॅककडे येऊन त्यांना घेऊन गेली. त्यांनीं तिला मॉर्फिआचें ( अफूचें ) इन्जेक्शन दिल्यावर तिला स्वस्थता लाभली. तिची तब्येत पाहतां क्षणीं डॉ. लेरॅकनीं तिच्या रोगाचें निदान केलें–' ट्युबरक्यूलस् पेरिटो-नायटिस '–एक तऱ्हेचा पोटांतील क्षयरोग. मग त्यांनीं तपासणी केली व नर्सनें सांगितलेली माहिती ताडून पाहिली. ती माहिती अशी होती : मेरीचे आईबाप अशाच तऱ्हेच्या क्षयरोगाला बळी पडले होते. सबंध आयुष्यभर मेरी आजारीच होती. १७ व्या वर्षीं तिला कोरडा खोकला झाला व रक्त पडलें. १८ व्या वर्षीं प्लूरसीची भावना झाली आणि डाव्या फुप्फुसांतून पाणी काढावें लागलें होतें. पुढें ती साधारण बरी झाली; पण पूर्ण निरोगी कधींच झाली नाहीं. आठ महिन्यांपूर्वीं तिच्या पोटांतील खालचा ( ॲबडोमेनचा ) भाग सुजूं लागला, ताप येऊं लागला आणि वरीलप्रमाणें रोग ठरविण्यांत आला. या यात्रेपूर्वीं कांहीं दिवस ऑपरेशनचा विचार चालला असतां मुख्य सर्जनला वाटलें कीं, तिची प्रकृति अगदीं मरणासन्न आहे. म्हणून तिची ' केस ' आशादायक नाहीं, असें तिच्या मंडळींना कळविण्यांत आलें. पण हा प्रवास करण्याचा मात्र तिचा निर्धार होता, त्यामुळें शेवटीं तिला संमति देण्यांत आली.

डॉ. लेरॅक यांनीं केलेल्या निदानाशीं सर्व माहिती जुळत होती. तिच्यावर अमुक एक ऑपरेशन करणें शक्य आहे असें त्यांना वाटूं लागलें होतें व ती बाई लूर्दहून परत आल्यास त्याचें पाहूं असा विचार त्यांनीं केला.

मॉर्फिआच्या अमलाखालीं मेरी स्वस्थ पडून होती. हळूहळू सूर्योदय झाला व कोंवळे रंगीत किरण मेरीच्या फिक्कट तोंडावर पडले. जीव-












नाचीं दारें ऐन यौवनांतच बंद व्हायची वेळ आलेली ती मेरी आणि भर तेजानें तळपणारे ते नवोदित सूर्याचे किरण—हा विरोधाभास मोठा करुणाजनक वाटत होता !

लूर्दच्या स्टेशनांत गाडी शिरल्यावर निरनिराळ्या ठिकाणच्या रोगी उतारूंनीं समूहप्रार्थना स्वयंस्फूर्तीनें केली. एकानें

*Ave maris stella*
*Dei mater alma*

असें भजन म्हटलें व सर्वांनीं त्याला साथ दिली. प्रत्येक डब्यांत उत्कट आतुरता वाढूं लागली व शेवटीं लूर्दच्या स्टेशनांत गाडी उभी राहिली.

रोग्यांची व्यवस्था स्थानिक इस्पितळांत करण्यांत आली होती. त्यांची निगा राखण्याचें काम स्वयंसेवकांवर सोंपविलेलें होतें. या स्वयंसेवकांपैकीं एक ए. बी. नांवाचा डॉ. लेरॅक यांचा वर्गबंधु निघाला. रोग्यांना स्ट्रेचरवर घालून पवित्र झऱ्याकडे न्यावयाचें काम करणाऱ्यांपैकीं तो एक होता. रोग्याची ने-आण करावयाला अजून अवकाश असल्यामुळें डॉक्टर व त्यांचा मित्र जरा दूरच्या एका हॉटेलांत गेले. वार्तेत त्यांनीं आपल्या या मित्रांतील व आपल्यांतील फरक पाहिला. हा मित्र अत्यंत भाविक आणि श्रद्धाळु बनला होता. उलट डॉक्टरांची धार्मिक श्रद्धा हळूहळू मावळत जाऊन आतां ते सहिष्णु वृत्तीचे संशयवादी बनले होते. बुद्धिवादानें त्यांच्या मनाचें संपूर्ण समाधान होई, पण त्यांच्या अंतःकरणांत खोल कोठें तरी अस्फुट वेदना होत राही. आपलें क्षेत्र फार संकुचित असून आपली वाढ खुरटलेली आहे अशा प्रकारची भावना, किंवा निश्चितपणा, स्वास्थ्य व प्रेम यांसाठीं तगमगणारी असंतुष्ट पिपासा ही त्या वेदनेच्या बुडाशीं होती.

मित्राकडे वळून डॉक्टर कांहीं वेळानें म्हणाले, "आज सकाळीं कुंडांतील पाण्यानें रोगी बरे झाल्याचें तुम्हांला माहीत आहे का ?"

"नाहीं," ए. बी. म्हणाला, "पण येथें नाहीं तरी पलीकडे ग्रोटोच्या बाजूला मीं आज एक चमत्कार पाहिला. एका म्हाताऱ्या बाईचा पाय मुरगळलेला होता. त्यामुळें पायांत कांहीं तरी असाध्य रोग झाला होता. ती त्यांतून बरी झाली व तिनें आपल्या कुबड्या फेंकून दिल्या."

"मी तिला ओळखतोसें वाटतें. सिस्टर डी. च ना ती ? तिची बाब म्हणजे स्वयंसूचने-(auto-suggestion) चा विस्मयकारक परिणाम आहे. तिला मीं तपासली होती. तिच्या पायांत कांहीं रोग नव्हता. पण तिच्या मनानें आपला पाय बरा नाहीं असेंच घेतलें. ती 'न्यूरॅस्थेनिक' बनली होती. ती लूर्दला आली आणि बरी झाली, यापेक्षा अधिक स्वाभाविक तें काय ?"

"पण इतर उपाय थकल्यावर लूर्दच्या पाण्यानें ती बरी झाली, याचें स्पष्टीकरण तुम्ही कसें करतां ?"

"त्याचें कारण हें," डॉक्टर म्हणाले, "कीं असल्या धार्मिक यात्रेमध्यें अशा मानसिक 'सूचने'-(suggestion) चें कल्पनातीत सामर्थ्य असतें. प्रार्थनेच्या वेळीं उत्साहपूर्ण झालेला आणि एकत्र आलेला मेळावा पाहिल्यानें ज्ञानतंतूंच्यावर आत्यंतिक परिणाम घडतो. मज्जातंतूंच्या विकृतीवर खोल परिणाम होतो, पण शारीरिक अवयवांतील (organic) विकृतींवर कांहीं परिणाम घडत नाहीं."

"कोठल्या प्रकारचे रोग बरे झाल्यानें तुम्हांला वाटेल कीं चमत्कार निर्विवाद असावेत ?"

"खरें म्हणजे शारीरिक अवयवांतील रोग बरे झाले पाहिजेत. तुटलेला पाय वाढूं लागला पाहिजे, कॅन्सर नाहींसा झाला पाहिजे किंवा जन्मजात निखळलेला हाडांचा सांधा (कॉन्जेनिटल डिसलोकेशन) तत्काळ बरा झाला पाहिजे." पुढें ते म्हणाले, "मला तुम्हीं म्हणतां तसा, हे रोग बरे झाल्याचा चमत्कार पाहायला मिळाला, तर मी माझे सर्व सिद्धान्त नि गृहीतकृत्यें पार बुडवून टाकीन ! मी येथें आलों आहे तो मला जें दिसतें तें सर्व शक्यतों बिनचूक नमूद करावयाच्या इच्छेनें आलों आहे...पूर्णपणें तटस्थ व वस्तुनिष्ठ दृष्टीनें पाहण्याचें मीं ठरविलें आहे आणि मी खात्रीनें सांगतों कीं एखादी उघडी जखम या पाण्यानें बरी होऊन भरून निघाल्याचें जर मला पाहायला मिळालें तर मी ईश्वरवादी तरी होईन, नाहीं तर मला वेड तरी








लागेल ! पण तसा योग अशक्यच दिसतो आहे. बहुतेक सर्व रोगी मज्जाविषयक पक्षाघातानें किंवा ट्रॉमॅटिक म्हणजे बाह्य आघातानें झालेल्या हिस्टेरियानें आजारी आहेत. फारच थोडे खऱ्या शारीरिक विकृतींनीं पछाडलेले आहेत. पण एक रोगी बाई आहे. ती अगदीं मरणासन्न आहे. ह्या मेरी फेरान्दला जर बरें वाटलें तर तो खरोखरच चमत्कार होईल. मला पुन्हां शंकाच राहणार नाहीं ! ''

लूर्दमध्यें निसर्गाचे सर्व नियम सारखे उलटे-पालटे होत असतात. '' मित्र म्हणाला, '' मला तरी नक्की वाटतें कीं, तुम्हीं म्हणतां ती मुलगी बरी होणार आहे. ''

मग रोग्यांना न्यायची वेळ होत आली म्हणून तो मित्र निघाला. तेव्हां डॉक्टरांनीं मित्राला सांगितलें, ही '' मुलगी हळूहळू खंगत चालली आहे. ती घरीं जिवंत पोंचली तर तोच एक चमत्कार म्हणावा लागेल. चला, जरा हिला पाहा तर खरी. ''

यात्रेकरूंच्या वॉर्डात येऊन त्यांनीं मेरी फेरान्दच्या कॉटकडे पावलें वळविलीं. नर्स डॉक्टरांची वाटच पाहात होती. मेरीला बोलवतहि नव्हतें. बहुधा ती अत्यंत झपाट्यानें खालावत चालली असावी, असें नर्सला वाटलें होतें.

डॉक्टरांनीं मेरीची नाडी पाहिली ती अत्यंत वेगानें चालली होती आणि हृदयाचे ठोके अनियमित पडूं लागले होते. त्यांनीं नर्सला हायपोडर्मिक सीरिंज आणावयास सांगितली, आणि त्यांनीं मेरीला कॅफीनचें इन्जेक्शन द्यायची तयारी केली. मेरीचें पांघरूण दूर होऊन पोटाचा भाग उघडा पडल्यावर पोटाच्या खालच्या भागावरील घट्ट घट्ट गोळे तेथें असलेले दिसले. मध्यभागावर त्यांत पाण्याचा अंशहि जाणवत होता. क्षीण मांडींत कॅफीन गेल्याबरोबर मेरीनें तोंड वांकडें केलें.

ए. बी.कडे वळून डॉक्टर म्हणाले, '' मीं म्हटलें तेंच. तोच क्षयरोगाचा प्रकार. कांहीं दिवसांची सोबती आहे ती फार तर ! पण तिचें नशीब ठरलेलें आहे. मृत्यु फार जवळ आला आहे ! ''

डॉक्टर निघाले तशी नर्स विचारूं लागली :

'' डॉक्टर, कुंडाकडे मेरीला घेऊन जाणें बरोबर होईल का ? ''

'' आणि वाटेंतच तिचा जीव गेला म्हणजे ? ''

'' पण तिचा तर निर्धारच आहे कीं, कुंडांत स्नान करावयाचेंच. इतकी लांब ती तेवढ्यासाठींच आली-- '' नर्सनें उत्तर दिलें.

त्याच वेळीं कांहीं दुसऱ्या ठिकाणच्या रोगी यात्रेकरूंबरोबर आलेले डॉ. जे. तेथें आले. डॉक्टर लेरॅकनीं त्यांना मेरीला तपासायला सांगितलें. डॉ. जे.नीं तपासल्यावर आपलें मत दिलें कीं, '' ती अगदीं मरणासन्न आहे. ग्रोटोकडे गेल्यावर जीव गेला तरी काय हरकत ! ''

मुख्य नर्सबाईनींहि म्हटलें, '' त्यांत तिची हानि कांहींच नाहीं. उलट कुंडावर नेल्यानें तिला जो आनंद होईल त्याला तिला कां मुकवावें ? '' शेवटीं डॉक्टरांनीं परवानगी दिली.

डॉ. जे. नीं जातां जातां पुन्हां एकदां मत दिलें कीं, '' पोर नक्कीच खलास होणार. ''

कुंडाच्यानजीक डॉक्टर पोंचले. तिकडून मेरीलाहि स्ट्रेचरवर घालून स्वयंसेवकांनीं आणलें. बाह्यतः ती बेशुद्धींत असावी असें वाटलें. डॉक्टरांनीं विचार केला, '' ही पोर या सर्व यात्रेकरू रोग्यांच्या देखत वारली तर त्यांच्या मनावर काय परिणाम होईल ? त्यांना चमत्कारांबद्दल काय वाटूं लागेल ? ''

रोगी लोकांचे थवे आतां येऊं लागले. मेरीची स्थिति जरी खराब होती तरी तिला असमाधान नव्हतें. खिस्ताच्या ठिकाणीं तिनें आपला आत्मा नि आपल्या आशा केंद्रित केल्या होत्या. डॉक्टरांना वाटलें, '' मेरीला शान्ततामय मृत्यु येईल. कोणत्याहि भक्ताचा मृत्यु असाच असतो. परमेश्वर त्याला श्रद्धेची शक्ति देतो आणि अमरत्वाचें सुख देऊं करतो यावर आपला विश्वास बसला तर किती बरें होईल ! '' ईश्वराविषयीं श्रद्धा ठेवावी अशी जबर इच्छा डॉक्टरांच्या मनांत मंथन करूं लागली. ते मनांतल्या मनांत कुमारी मेरीची प्रार्थना करूं लागले कीं, '' मेरी, फर्नान्दला तूं बरें करून तिच्या असह्य यातना दूर कर; आणि मला श्रद्धेची भिक्षा घाल. ''







कुंडाशीं अनेक यात्रेकरू होते. पाद्री व्हर्जिन मेरीची प्रार्थना करून या गरीब बिचाऱ्या लेंकरांवर कृपादृष्टि करावयास तिला आळवीत होता. त्यानें सर्वांना प्रार्थना करावयासाठीं हात वर करण्यास सांगितलें. हातांचें एक रानच्या रान वर उभें राहिलें ! मोठा परिणामकारक तो देखावा होता. डॉक्टरांना पटलें कीं, आपल्यासारख्या सशक्त, निरोगी माणसावर जर या वातावरणाचा इतका परिणाम होतो, तर या रुग्णाईत आणि अशक्त लोकांवर किती होत असेल ?

मेरी फेरान्दला नजीकच्या ग्रोटोकडे नेण्यांत आलें होतें. तेथें उंच ठिकाणीं व्हर्जिन मेरीची खडकांत कोरलेली शिल्पाकृति होती आणि जवळच पवित्र झरा वाहत होता. डॉक्टर मेरी फेरान्दच्या जवळ गेले. मेरी निश्चल होती, तिचा श्वास जोरांत चालला होता आणि तो वरच्या वर चालला होता. मरणाच्या अगदीं समीप आल्यागत ती वाटत होती. यात्रेकरूंची गर्दी वाढूं लागली होती.

लेरॅकनीं मेरी फेरान्दकडे पुन्हां एकदा दृष्टि वळवली. ते एकदम नजर रोखून तिच्याकडे पाहूं लागले. त्यांना वाटूं लागलें कीं, मेरींत कांहीं तरी फरक पडला असावा. तोंडावरच्या काळसर छटा गेल्या होत्या आणि कातडी करडी राखी वाटूं लागली होती. नक्कीच हा कांहीं तरी भ्रमाचा प्रकार आहे, ' hallucination ' आहे, असें त्यांना वाटूं लागलें. पण तो भ्रमच मानसिक दृष्टीनें मोठा लक्ष देण्यासारखा वाटूं लागला. घाईघाईनें त्यांनीं ती वेळ नोटबुकांत नमूद केली. जर मेरी फेरान्दच्या तब्येतींतील हा फरक भ्रमोत्पादक असेल, तर तसा भ्रमहि लेरॅकला पहिल्या प्रथमच अनुभवायला मिळत होता ! त्यांनीं जवळच असलेल्या आणखी एका डॉक्टर एम्. ना बोलावून मेरीला तपासावयास सांगितलें : " तुम्हांला वाटतें का कीं तिच्यांत कांहीं फरक पडला असावा ? " एम्. नीं मेरीला येथें येतांना पाहिलें होतें. त्यांनीं आतां तिच्याकडे पाहून म्हटलें : " होती तशीच मला दिसते आहे. एवढेंच म्हणतां येईल कीं, तिची स्थिति आणखी खराब झालेली नाहीं. "

" पण मला वाटतें तिच्या नाडीचा वेग कमी झाला असावा " डॉ. लेरॅक डॉ. एम्. ला म्हणाले.

" याचा अर्थ असाहि असेल कीं ती मरायला टेकली आहे. "

लेरॅकनीं कांहीं उत्तर दिलें नाहीं. त्यांना वाटत होतें कीं, त्या बाईच्या एकंदर तब्येतींत सुधारणा होत आहे. कांहीं तरी घडत आहे. मनांत उसळणाऱ्या कांहीं एका भावनेला दाबून टाकून त्यांनीं मेरी फेरान्दची तब्येत न्याहाळण्यास सुरुवात केली. तिचा चेहरा सावकाश बदलत होता. तिचे डोळे इतका वेळ अगदीं निस्तेज होते ते आतां उघडलेले असून अत्यंत हर्षानें व्हर्जिन मेरीकडे बघत होते. कारण ती अजून ग्रोटोच्या परिसरांतच होती.

एकदम लेरॅक स्वतःच फिक्के पडूं लागले. मेरी फेरान्दच्या ब्लँकेटमधूनहि तिच्या पोटांतील (अॅब्डोमेनमधील) सुजलेला भाग वर आलेला दिसत असे तो हळूहळू सपाट होऊं लागला.

" अहो डॉक्टर एम्., तिच्या अब्डोमेनकडे पाहा बरं जरा !" ते ओरडूनच म्हणाले.

" अरे, खरंच " एम्.हि म्हणाले. " तो भाग दबलेला दिसतो खरा. कदाचित् ब्लँकेटच्या घड्यांमुळे असें वाटत असेल. "

कांहीं मिनिटांनीं त्यांनीं तिकडे पाहिलें, तर पोटाखालील सुजेची नांवनिशाणीहि तेथें नव्हतीसें दिसूं लागलें.

लेरॅकला वाटूं लागलें, आपण आतां वेडे होणार !

मेरीला बरें वाटत होतें म्हणून लेरॅक ग्रोटोपासून दूर गेले. अजून त्यांनीं मेरीला तपासलें नव्हतें. पण कांहीं झालें तरी त्यांनीं स्वतःच्या डोळ्यांनीं निदान शरीरव्यापाराच्या (functional) दृष्टीनें सुधारणा होत असलेली नक्की पाहिली होती. शरीररचनात्मक (organic) फरकहि पडला होतासें वाटलें, पण तपासणीनंतर तें नक्की कळणार होतें. ही शरीरव्यापारांतील सुधारणासुद्धां एक चमत्कारच होता. किती सहज, किती नकळत गूढपणें तो घडला व आपण पाहिला ! ग्रोटोमधील लोकसमूहाला याची कांहीं दादहि नव्हती.

मरायला टेकलेली मुलगी बरी होत होती !










मृताचें पुनरुत्थान होत होतें ! एक चमत्कार घडत होता !

पुढें ते परत आपल्या हॉटेलमधून हॉस्पिटलमध्यें गेले. तेथें पाहतात तों मेरी फेरान्द आपल्या कॉटवर पांढरें जाकीट घालून बसलेली आहे. डॉक्टरना पाहून ती म्हणाली, " डॉक्टर, मी साफ बरी झालें बघा. मला अशक्तपणा वाटतो आहे, पण मी चालूंहि शकेनसें वाटतें. "

लेरॅकनें नाडीवर बोट टेकलें. नाडी शान्तपणें व नियमित चालली होती. तिचा श्वासोच्छ्वास अगदीं नेहमींप्रमाणें होऊं लागला होता. लेरॅकच्या डोक्यांत गोंधळ होऊं लागला होता. ही बाह्यतः घडणाऱ्या ' ऑटो-सजेशन् ' च्या परिणामाची 'केस' आहे का खरोखरच कांहीं नवीन घटना आहे ! अशक्यप्राय आणि अविश्वसनीय ! काय हा चमत्कार ? मग जरा थांबून विचार करीत त्यांनीं तिचा पोटाखालचा भाग तपासला. तेथील घट्ट गोळ्याचा भाग ते पाहूं लागले. पण एखाद्या वाईट स्वप्नाप्रमाणें तो नाहींसा झाला होता !

लेरॅकला घाम सुटला. जणूं कोणी तरी गालावर जोराची थप्पड लगावल्याप्रमाणें त्याला झालें. त्याच्या हृदयाची धडधड अतिशय जोरानें सुरु झाली. पण पोलादी निर्धारानें त्यांनीं तिची तपासणी चालूं ठेवली.

त्यांच्या दोन्ही सहकारी डॉक्टर्सनीं तिला तपासलें. डॉ. जे. अत्यंत भावनात्मकतेनें म्हणाले, " ती बरी झाली आहे. " डॉ. एम्.नाहि तेथें रोगाचें चिन्हहि सांपडेना. डॉ. जे. पुन्हां म्हणाले, " या प्रकाराचें कांहीं स्पष्टीकरणहि शक्य नाहीं. "

लेरॅक शान्त होते. त्यांनीं मेरीकडे पाहिलें नि विचारलें, " आतां तूं बरी झालीस असें वाटतें ना ? मग यापुढें तूं काय करणार ? "

मेरीनें उत्तर दिलें, " सेंट व्हिन्सेंट द पॉल इस्पितळांत मी सिस्टर म्हणून दाखल होईन आणि आजाऱ्यांची शुश्रूषा करीन ! "

आपली उचंबळणारी भावना लपविण्यासाठीं लेरॅक त्या खोलींतून बाहेर पडले.

आणखी कांहीं रोगी तपासून डॉक्टर त्या गर्दींतून वाट काढीत रस्त्याला लागले आणि त्या झऱ्याच्या कांठावर येऊन बसले...झऱ्याच्या कांठीं डॉ. लेरॅक एकटेच होते. ते व्हर्जिन मेरीच्या ग्रोटोमधील पुतळ्याकडे पाहूं लागले. तेथून तो झरा उगम पावत होता. रोगनिवारण करणारी शक्ति त्याच झऱ्यांत होती, ही गोष्ट लेरॅकच्या बुद्धीला पटत नव्हती !

मध्यरात्र झाली आणि चंद्र टेकडीआडून वर आला तरी डॉ. लेरॅक ग्रोटोमध्येंच होते. त्यांच्या मानवी हृदयांत एकाकीपणाची, अस्वस्थपणाची हुरहुर उत्पन्न झाली. त्या अंधारांत आपल्या वैज्ञानिक संशयानिशीं आणि प्रश्नांनिशीं ते तेथें बसले होते. लूर्दच्या या रोगनिवारणाचा कार्यकारणसंबंध कसा लावावयाचा ?

अशा प्रकारें एखाद्या चमत्कारांत स्वत: गोवलें जाणें ही व्यक्तिगत दृष्ट्या अतिशय क्लेशकारक गोष्ट होती. कित्येक डॉक्टरांना आपल्या बौद्धिक दर्जा खालावण्याची इतकी भीति वाटे कीं, लूर्दला गेले असतां त्यांनीं कांहीं चमत्कार पाहिले तरी ते कबूल करणें त्यांना जड जाई. त्यांपैकीं बहुतेकांना अजूनहि म्हणावेसें वाटे कीं, लुर्दमध्यें भोळसट वैदूगिरीवांचून दुसरें कांहीं नाहीं ! त्यांना अशी भीति वाटे कीं, आपणांला या गोष्टींत कांहीं गोडी आहे असें दाखविलें, तर लोक आपल्याला धर्मांध किंवा खुळे तरी म्हणतील !

पण लेरॅकला मात्र वाटत होतें कीं " याचा छडा लावला पाहिजे. तें अत्यंत आवश्यक आहे. या असमर्थनीय गोष्टीचें स्पष्टीकरण मिळवलेंच पाहिजे. नैसर्गिक घटना, जीवनाचे कायदे हे अजूनहि बहुतेक बाबतींत गूढतेंतच गुण्डाळलेले आहेत. टेलीपथीला कांहीं काळापूर्वीं चमत्कारच समजत. आणि वीज व मेघगर्जना ह्या नैसर्गिक घटना आहेत हें समजलें नव्हतें तोंपर्यन्त त्या गोष्टी म्हणजे ईश्वराचा प्रकोप आहेत असेंच लोक मानीत. तेव्हां अजूनहि कांहीं नैसर्गिक नियम मानवाला अज्ञात असतील व ते समजले म्हणजे या लूर्दच्या रोगनिवारणाची चमत्कारिक व गूढ घटना स्पष्ट करतां येईलहि "








लेरॅकच्या मनांतील संघर्ष चालूच होता. ईश्वराचें अस्तित्व मान्य करणें किंवा अमान्य करणें या दोहोंपैकीं कांहींच शक्य नव्हतें. पाश्चूरसारखे महान् शास्त्रज्ञ आपल्या धर्माशीं विज्ञानाची सांगड कशी घालीत याचें लेरॅकला नवल वाटलें. कदाचित् विज्ञानाची आणि धर्माची प्रणाली ( system ) परस्परनिरपेक्ष अशी वेगळी असूं शकेलहि.

आधिभौतिक किंवा अतिभौतिक गोष्टींची जेव्हां एखादा शास्त्रज्ञ आपल्या बौद्धिक तंत्रानें चिकित्सा करूं लागतो तेव्हां त्याचा गोंधळ उडतो, त्याला आपला बौद्धिक तर्क तेथें चालवितां येत नाहीं. कारण, बौद्धिक तर्कवाद हा घटना प्रस्थापित करणें आणि त्या घटनांचे परस्पर संबंध जाणणें एवढेंच कार्य करतो. कारणांच्या शोधामागें लागलें म्हणजे तेथें निर्विवाद व स्वतःसिद्ध ( absolute ) असें कांहीं मिळत नाहीं. मार्गावर खुणेचे दगड दिसत नाहींत, खऱ्याखोट्याचा पुरावा सांपडत नाहीं. या गूढ प्रदेशांत कांहींहि शक्य असूं शकेल. बौद्धिक विचारपद्धतींचें येथें कांहीं चालत नाहींसें वाटूं लागतें. जीवन आणि मृत्यु यांच्या रहस्यामुळें नुसत्या सिद्धान्तांच्या प्रणालिका व्यर्थ ठरतात. विज्ञानानें मानवाच्या आंतरिक जीवनाचें पोषण झालेलें नाहीं; तें आत्म्याच्या श्रद्धेनें झालें आहे. लेरॅकना ह्याचा निर्णय करणें भागच होतें. त्यांना आपल्या रोगनिदानाबद्दल यत्किंचित् शंका नव्हती. एक चमत्कार घडला ही गोष्टहि निर्विवाद होती. पण तो ईश्वरेच्छेनें घडला होता काय? एखाद्या दिवशीं आपल्याला हें रहस्य उमगेल. तोंपर्यंत तें रोगनिवारण झालें एवढेंच सांगणें सुरक्षितपणाचें होतें; तें ते खात्रीपूर्वक सांगूं शकत होते. पण खोल आंत कोठें तरी त्यांना वाटत होतें कीं एवढ्यानें भागत नाहीं!

ग्रोटोंतील व्हर्जिन मेरीच्या चर्चच्या पायऱ्या चढून ते वर गेले. मेणबत्त्यांच्या प्रकाशांत ऑर्गन वाजत होता आणि हजारों कंठांतून प्रार्थना गायिली जात होती. ते मागच्या बाजूला एका वृद्ध शेत-कऱ्याजवळील खुर्चीवर बसले. बराच काळ ते स्तब्ध बसले होते. आपल्या हातांनीं तोंड झांकलें होतें. स्तवनभजनांकडे त्यांचें लक्ष लागलें होतें. आणि मग त्यांना आढळून आलें कीं आपणहि प्रार्थना करीत आहोंत :

" प्रभो, माझी तुजवर श्रद्धा आहे. एका दिव्य चमत्कारानें तूं माझ्या प्रार्थनांना 'ओ' दिली आहेस. पण मला ती अजून समजत नाहीं, मला अजून संशय आहे. पण माझ्या जीवनांतील सर्वांत मोठी आकांक्षा म्हणजे तुजवरील श्रद्धा प्राप्त होणें ही आहे. अधिक भावनोत्कट, स्वयंभू श्रद्धा प्राप्त होऊन अधिक पृथक्करण व संशय यांची गरज न राहणें ही माझी परम इच्छा आहे......माझ्या बौद्धिक अभिमानाच्या भयंकर दडपणाखालीं एक गुदमरलेलें स्वप्न अजूनहि जिवंत आहे. अरेरे! अजूनहि तें केवळ स्वप्नच आहे, पण तें किती आकर्षक आणि मोहक आहे! परमेश्वराच्या लाडक्या संतांच्या तेजस्वी चैतन्याहद, प्रभो, तुजवर श्रद्धा ठेवणें आणि तुजवर प्रेमभक्ति ठेवणें हें तें स्वप्न आहे."

ते आपल्या हॉटेलांत आले तेव्हां त्यांना वाटलें, आपण अनेक दिवसांनीं येथें येत आहोंत. त्या वेळीं प्रातःकाल होत होता. उघड्या खिडक्यांतून गार वारा झुळझुळत होता. आपल्या अंतःकरणांत सृष्टीचें प्रशान्त गांभीर्य प्रवेशत असल्याचा भास त्यांना होत होता. दैनंदिन व्यवहार, गृहीत कृत्यें, सिद्धान्तप्रणाली आणि बौद्धिक संशय हीं पार नाहींशीं झालीं होतीं. त्यांना वाटूं लागलें कीं, आपणांस एक दृढ निश्चित निष्ठा ( certitude ) प्राप्त झाली आहे. त्यांतून निर्माण होणारी प्रशामक शान्तता त्यांना भासमान होत होती. त्यांची अस्वस्थता गेली, सर्व संशयांचा निरास झाला.

उषःकालच्या अमर सौंदर्यांत डॉ. लेरॅक झोपेच्या अधीन झाले.

---



अनुक्रमणिका

# भारताचें आर्थिक जीवन सुधारण्याचा एक मार्ग

भारताच्या आर्थिक जीवनाचा वरवर विचार करणारांच्याहि हें सहज लक्षांत येतें कीं, हिंद हा आर्थिकदृष्ट्या अतिशय गरीब देश आहे. जगांतील प्रमुख राष्ट्रांच्या दर माणशीं वार्षिक सरासरी उत्पन्नाचे आंकडे नुकतेच प्रसिद्ध करण्यांत आले. त्यांवरून असें दिसून आलें आहे कीं, एकंदर ७० देशांमध्यें दर माणशीं सरासरी वार्षिक उत्पन्नाच्या दृष्टीनें हिंदचा क्रमांक ५५ वा लागतो. मार्च १९५१ मध्यें झालेल्या खानेसुमारीचे तात्पुरत्या अंदाजाच्या स्वरूपाचे आंकडे नुकतेच प्रसिद्ध झाले आहेत. त्यांवरून गेल्या १० वर्षांत हिंदची लोकसंख्या १३ टक्क्यांनीं वाढली असल्याचें दिसून आलें आहे. गेल्या दहा वर्षांत एकंदर सर्व प्रकारच्या उत्पादनांत या मानानें वाढ मुळींच झालेली नाहीं. उत्पन्नाच्या वाढीच्या प्रमाणापेक्षां लोकसंख्येची जास्त वाढ, अशी परिस्थिति गेलीं कित्येक वर्षें हिंदमध्यें दिसत असल्यामुळें, जनतेचें सर्वसामान्य दारिद्र्य दिवसेंदिवस वाढतच आहे. १९४३ पासून युद्धोत्तर पुनर्घटनेच्या उत्पादनवाढीच्या अनेक योजना जनतेसमोर मांडल्या गेल्या. परंतु यांपैकीं एकहि योजना कृतींत उतरविली गेली नाहीं व विशेषत: गेलीं तीन वर्षें उत्पादनाची एकंदर परिस्थिति अगदीं असमाधानकारक आहे. अगदीं अलीकडे जुलै १९५१ पासून सहा वर्षांच्या मुदतीची 'कोलंबो योजना' ब्रिटिश राष्ट्रकुटुंबाच्या प्रेरणेनें पुढें मांडली गेली आहे. या योजनेचा विशेषत: शेतीच्या उत्पादनाच्या वाढीवर विशेष भर आहे. याच वेळीं सरकारनें नेमलेल्या प्लॅनिंग कमिशनमार्फत निरनिराळ्या धंद्यांसाठीं प्रत्येकीं पांच वर्षांचा उत्पादनवाढीचा कार्यक्रम आंखण्यांत आला आहे.

हिंदमध्यें आज शेतीचें उत्पादन निदान १० टक्क्यांनीं तरी वाढवावयास पाहिजे आहे, ही गोष्ट सर्वमान्य आहे. शेतीचें उत्पादन वाढविणें हा अगदीं पुरातन काळापासूनचा एक मार्ग आहे. औद्योगिक क्रांतीनंतरच्या काळांत निरनिराळ्या कारखानी मालाचें उत्पादन वाढविणें, हा एक महत्त्वाचा मार्ग खुला झाला. कच्चा माल व पुरेसें भांडवल असेल तर यंत्रशास्त्राच्या पद्धतीनें व संघटनाचातुर्यानें कारखानी मालाचें उत्पादन वाढविणें सोपें असतें. परंतु गेल्या १०० वर्षांतील निरनिराळ्या देशांच्या उत्पादनवाढीच्या इतिहासाचा अभ्यास केला असतां असें दिसून येतें कीं, एखादा देश श्रीमंत बनावयाचा असेल तर त्यासाठीं केवळ शेती व कारखानी मालाचें उत्पादन वाढवून चालत नाहीं, तर त्याचबरोबर व्यापार—वहातूक—बँकिंग—विमा इ. व्यवसाय वाढवावे लागतात; व हे व्यवसाय जितक्या प्रमाणांत वाढवितां येतात त्यावर त्या देशाच्या श्रीमंतीचें किंवा आर्थिक दर्जाचें मान अवलंबून असतें. अशा प्रकारच्या व्यवसायांना इंग्लिशमध्यें tertiary occupations असें म्हणतात. सुप्रसिद्ध अर्थशास्त्रज्ञ कोलिन क्लार्क यांनीं जगांतील प्रमुख देशांची पाहाणी करून आपल्या एका सुप्रसिद्ध ग्रंथांत[1] व्यापार-वाहतूक बँकिंग-विमा इ.

1 " Conditions of Economic Progress "—Collin Clerk








व्यवसाय वाढविण्यावरच कोणत्याहि देशाची श्रीमंती कशी अवलंबून असते, हें आंकड्यांच्या साहाय्यानें दाखवून दिलें आहे. हिंदच्या आर्थिक परिस्थितीचा विचार या दृष्टिकोनांतून करणें आवश्यक आहे. आजपर्यंत शेतीचें उत्पन्न वाढविणें किंवा निरनिराळे उद्योगधंदे स्थापन करणें या गोष्टींवरच भर दिला गेला. शेतीचें उत्पन्न पद्धतशीर रीतीनें वाढविण्याचे प्रयत्न अद्याप म्हणण्यासारखे झालेले नाहींत. गेल्या शतकाच्या उत्तरार्धांत दुष्काळी परिस्थितीच्या दडपणामुळें पाटबंधाऱ्यांचीं कामें करून शेतीचें उत्पन्न वाढविण्यास सरकारनें थोडेंसें प्रोत्साहन दिलें. त्याचप्रमाणें गेल्या १०० वर्षांत खासगी रीत्या कापड, पोलाद, साखर, सिमेंट इ. धंदे स्थापन करून कारखानी मालाचें उत्पादन वाढविण्याचे प्रयत्न कांहीं भांडवलदारांनीं केले; व याच कालांत परकीय, विशेषतः ब्रिटिश भांडवलदारांनीं ताग, कोळसा, रासायनिक धंदे इ. धंद्यांचें उत्पन्न वाढविण्याचे प्रयत्न केले. या सर्वांचा परिणाम म्हणून हिंदमध्यें आधुनिक पद्धतीचें औद्योगिक किंवा कारखानी उत्पादन सुरू झालें. परंतु हें सर्व काळाच्या ओघांत घडून आलें. या प्रयत्नाच्या बुडाशीं जनतेचें दारिद्र्य दूर करणें किंवा देशाला श्रीमंत बनविणें अशी दृष्टि फारशी नव्हती. पहिल्या महायुद्धानंतरच्या काळांत जनतेच्या पुढाऱ्यांचें लक्ष या प्रश्नाकडे वळलें व हिंदी भांडवलदारहि उद्योगधंदे स्थापन करतांना किंवा वाढवितांना उत्पादनवाढीच्या दृष्टीनें कांहींसा विचार करूं लागले. परंतु या प्रयत्नांत कोणत्याहि प्रकारचा एकसूत्रीपणा नव्हता. दुसऱ्या महायुद्धामुळें उत्पादनवाढीसाठीं एकमुखानें संघटित प्रयत्न केले पाहिजेत व या बाबतींत योजनाबद्ध अर्थव्यवहार पाहिजे या गोष्टींकडे पुष्कळांचें लक्ष जाऊं लागलें. हें सर्व खरें असलें, तरी अजूनहि आपल्या देशांत योजनाबद्ध अर्थव्यवहाराला सुरुवात झालेली नाहीं; व कोलिन क्लार्क यांनीं व्यापार—वाहतूक बँकिंग—विमा इ. प्रकारचे व्यवसाय वाढविण्यावरच देशाची श्रीमंती अवलंबून असते हा जो मुद्दा प्रतिपादिला आहे, त्याकडे अजूनहि लक्ष देण्यांत आलेलें नाहीं. या दृष्टीनें आज अशा प्रकारचे व्यवसाय विशेष रीतीनें वाढविणें कसें आवश्यक झालें आहे, याचा थोडक्यांत विचार करूं.

### उत्पन्नांत भर

आधुनिक अर्थव्यवस्थेमध्यें व्यापार-वाहतुक-बँकिंग-विमा इ० प्रकारचे व्यवसाय देशाच्या श्रीमंतीमध्यें कशी भर घालूं शकतात याचा प्रथम विचार करूं. शेत किंवा कारखाना यांमध्यें उत्पादन प्रत्यक्ष होऊं शकतें. परंतु शेती-माल किंवा कारखानी-माल यांना खरें महत्त्व त्यांना विक्री-माल म्हणून स्थान प्राप्त होणें या गोष्टीवर अवलंबून असतें. हिंदमधल्या कित्येक खेडेगांवांतून असा अनुभव येतो कीं, दूध, भाजीपाला, फळें इ. मालाला गांवांत खप नसेल तर विशेषशी किंमत येऊं शकत नाहीं, तर ज्या वेळीं हा माल नजीकच्या किंवा दूरच्या बाजारपेठेमध्यें जातो त्याच वेळीं त्याला विक्री-माल म्हणून दर्जा प्राप्त होतो. याचाच अर्थ हा कीं, खेडेगांवांतून उत्पन्न होणाऱ्या दूध, भाजीपाला, फळें इ० मालाची वाहतूक एखाद्या बाजारपेठ असलेल्या शहरापर्यंत झाली पाहिजे, या वस्तूंचा व्यापार करणारा वर्ग अस्तित्वांत आला पाहिजे व कोणत्याहि व्यापारी केंद्राची भरभराट व्हावयास पाहिजे असेल तर तेथें व्यापारी लोकांना उपयोगी पडेल अशी बँक असली पाहिजे. कारण बँक असली म्हणजे पैशाचे व्यवहार सोयीस्कर रीतीनें केले जातात, व बँकेमुळें आजूबाजूच्या लोकांत पैसा शिल्लक टाकण्याची वृत्ति निर्माण होते. ठेवींच्या रूपानें बँक पैसा गोळा करूं शकली कीं या पैशापैकीं ६० ते ८० टक्के पैसा बँक योग्य तारणावर उद्योगधंद्यांना अल्प मुदतीनें कर्ज म्हणून देऊं शकते. याप्रमाणें बँकेच्या लोकांच्या हातीं असलेल्या पैशाला चालना मिळूं शकते व तो पैसा केवळ पडीत न राहतां त्यापैकीं बहुतेक पैसा कोणत्या तरी उत्पादक व्यवसायाला मिळूं शकतो. यामुळें बँका या जणूं कांहीं व्यापार व उद्योगधंदे यांच्या बाबतींत वंगणाच्या तेलाप्रमाणें उपयुक्त ठरतात. आजच्या आर्थिक युगामध्यें पडून राहणाऱ्या पैशाला कांहीं किंमत नसते. जो पैसा कोणत्याहि आर्थिककार्यासाठीं उपयोगांत आणतां येतो तोच पैसा उपयुक्त ठरतो. येथें केलेल्या या










विवेचनावरून असें स्पष्टपणें दिसून येतें कीं, संपत्तीचें किंवा मालाचें उत्पादन होणें जितकें आवश्यक असतें तितकेंच त्या मालाला विक्री-माल म्हणून महत्त्व प्राप्त करून देणें, ही गोष्टहि आवश्यक असते. वाहतूक, व्यापार व बँका यांमुळें खेडेगांवांत निर्माण होणाऱ्या मालाला विक्री-माल म्हणून महत्त्व प्राप्त होऊं शकतें. या कारणामुळेंच अनेक देशांच्या तुलनात्मक अभ्यासावरून कोलिन क्लार्क यांनीं व्यापार–वाहतूक–बँकिंग–विमा इ. व्यवसायांचें महत्त्व प्रतिपादन केलें आहे. आजच्या व्यापारी युगांत निरनिराळ्या प्रकारच्या विमा-व्यवसायाला साहजिकच महत्त्व प्राप्त झालें आहे. आयुष्याचा विमा, मालाचा विमा, आगीचा विमा, जलवाहतुकीचा विमा, इमारतींचा विमा इ. विम्याचे अनेक प्रकार रूढ झाले आहेत व हे सर्व प्रकार व्यापारी व औद्योगिक जीवनांतील धोक्यांपासून एक प्रकारें संरक्षण करूं शकत असल्यामुळें, विमाव्यवसायाला विशेष महत्त्व प्राप्त झालें आहे.

गेल्या कांहीं वर्षांत वाहतुकीच्या साधनांत बरीच प्रगति झाल्यामुळें विक्री-मालाच्या दृष्टीनें सर्व जग ही एकच बाजारपेठ बनली आहे. याचा परिणाम असा झाला आहे कीं, कारखान्यांत प्रचंड प्रमाणांत मालाचें उत्पादन झाल्यावर तो माल जगांतल्या दूरदूरच्या बाजारपेठांत पोंचविण्यासाठीं वाहतुकीच्या साधनांची त्वरित वाढ व्हावी लागते, त्याचबरोबर पर्यायानें बँकिंग व विमा हे व्यवसाय वाढवावे लागतात व व्यापारी वर्गहि अस्तित्वांत यावा लागतो. मोठमोठ्या उत्पादन करणाऱ्या कंपन्यांचे विक्रेते प्रत्येक देशांत पसरलेले असतात व त्यांचे व्यापारी एजंटसुद्धि असतात. एवढेंच नव्हे तर प्रत्येक सुधारलेल्या सरकारचे व्यापारी कमिशनर्स महत्त्वाच्या देशांत असतात. मालाची विक्रीच्या दृष्टीनें प्रसिद्धि करणें ही एक महत्त्वाची बाब बनली आहे. 'एक जग' ही कल्पना जगांत प्रत्यक्ष शांतता निर्माण करण्याच्या दृष्टीनें केवळ कल्पनाच राहूं शकेल; परंतु उद्योगधंदे व व्यापार यांच्या दृष्टीनें जग निःसंशय बऱ्याचशा बाबतींत एक बनत चाललें आहे. हिंदुस्थानांत गेल्या शतकाच्या मध्यापासून जलवाहतूक, बँकिंग व विमा हे तीन व्यवसाय करणाऱ्या अनेक परकीय कंपन्या स्थापन झाल्या. कारण इंग्लंडच्या हिंदुस्थानशीं चालणाऱ्या व्यापाराला अशा प्रकारच्या कंपन्यांची विशेष आवश्यकता होती. हे तीन व्यवसाय ब्रिटिश भांडवलानें इतके वाढले कीं, दरवर्षी कमींत कमी रु. २५ ते ३० कोटी इतकी रक्कम अदृश्य निर्गतीच्या रूपानें वरील तीन व्यवसायांमुळें हिंदुस्थानांतून इंग्लंडकडे जाऊं लागली. सारांश, यंत्रशक्तीनें संपत्तीचें कारखान्यांत मोठ्या प्रमाणांत उत्पादन होऊं लागलें कीं थोड्या अवधींतच असा समय येतो कीं, वाहतूक करणाऱ्या रेल्वे व आगबोट कंपन्या, हरतऱ्हेचा विमा-व्यवसाय करणाऱ्या कंपन्या, अंतर्गत व परराष्ट्रांशीं बँकिंगचा व्यवहार करणाऱ्या कंपन्या व अंतर्गत आणि परराष्ट्रीय व्यापार करणारा व्यापारी वर्ग व त्याचे हस्तक यांचीं जाळीं सर्व ठिकाणीं पसरविणें आवश्यक बनतें. किंबहुना जगांतील बरेचसे देश उद्योग-प्रधान बनूं लागले म्हणजे मालनिर्मितीच्या कारखान्यापेक्षांहि वाहतूक-व्यापार-बँकिंग-विमा इ० व्यवसायांचें महत्त्व वाढत जातें. कारण हे धंदे करणारांच्या हातांत आर्थिक जीवनाचीं बरीचशीं सूत्रें राहतात. महायुद्धाच्या काळांत प्रत्यक्ष उत्पादनापेक्षां वाहतुकीच्या मार्गांत निर्माण होणाऱ्या अडचणी या जास्त नुकसानकारक ठरतात, हा अनुभव अगदीं ताजा आहे. दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळांत अंतर्गत व परराष्ट्रीय वाहतुकीचा अपुरेपणा निरनिराळ्या उद्योगधंद्यांना कसा तीव्रतेनें जाणवला, वाहतुकीच्या या अपुरेपणामुळें कच्च्या मालाचा तुटवडा कसा जाणवूं लागला व त्याचा परिणाम उत्पादनावर कसा झाला, हाहि अनुभव ताजाच आहे.








## कांहीं देशांच्या उत्पादनाचें पृथक्करण

खालील कोष्टकांत[२] प्राथमिक स्वरूपाचे शेती, मच्छीमारी यांसारखे धंदे, आधुनिक पद्धतीचे कारखाने, बैठे उद्योगधंदे आणि वाहतूक-व्यापार बँकिंग-विमा यांसारखे धंदे यांवर अवलंबून असणारांचें दर १०० लोकसंख्येमागें प्रमाण दाखविणारे आंकडे दिले आहेत. ब्रिटन व अमेरिका हे उत्पन्नाच्या दृष्टीनें पहिल्या दर्जाचे देश आहेत हें लक्षांत ठेवावें. हिंदमध्यें प्राथमिक उत्पादनावर अवलंबून असणारांचें शेंकडा प्रमाण कसें जास्त आहे हें दिसून येतें.

वरील शेंकडा प्रमाण दाखविणाऱ्या आंकड्यांवरून हिंदुस्थानांत शेतीवर अवलंबून असणारांचें प्रमाण सर्वांत जास्त असून, उद्योगधंदे व व्यापार-वाहतूक-विमा-बँकिंग यांसारख्या व्यवसायांवर अवलंबून असणारांचें प्रमाण अगदीं कमी आहे हें स्पष्टपणें दिसून येतें. १९४९ च्या आंकड्यांप्रमाणें वरील देशांचें दर माणशीं सरासरी वार्षिक उत्पन्न अमेरिकन डॉलर्समध्यें अमेरिकेचें १४५३, ब्रिटनचें ७७३, जर्मनीचें ३२०, फ्रान्सचें ४८२, जपानचें १०० व हिंदचें ५७ याप्रमाणें आहे. या तुलनात्मक आंकड्यांवरून हिंदच्या दारिद्र्याची स्पष्ट कल्पना येते. आजच्या यांत्रिक शक्तीवर अवलंबून असणाऱ्या अर्थप्रधान समाजरचनेमध्यें शेती हा धंदा कोणत्याहि देशाला श्रीमंत करूं शकत नाहीं. देशाच्या श्रीमंतीला उद्योगधंदे व व्यापार-वाहतूक-बँकिंग-विमा यांसारख्या धंद्यांवर अवलंबून असणारांचें प्रमाण जास्त असलें पाहिजे. याहि धंद्यांत दर माणशीं उत्पादन शक्य तितकें जास्त राखण्याचा प्रयत्न केला पाहिजे. ब्रिटन-अमेरिके सारख्या देशांत व्यापार-वाहतूक यांसारख्या व्यवसायांवर अवलंबून असणारांचें उत्पन्न किती तरी मोठें असतें. उलट हिंदमध्यें याहि व्यवसायावर अवलंबून असणारांचें उत्पन्न इतर देशांच्या मानानें फारच कमी आहे. याचें कारण हिंदमधील आर्थिक दर्जाची पातळी अजून अगदीं खालीं आहे.

१९४८-४९ या वर्षीं निरनिराळ्या प्रकारें हिंदमध्यें उत्पादन कसें झालें याचें आंकडे पुढें दिले आहेत :

| | रु. कोटी | शेंकडा प्रमाण |
|---|---|---|
| प्राथमिक व्यवसायापासून उत्पन्न | २४७८ | ५३.५ |
| उद्योगधंद्यांपासून उत्पन्न | ११५४ | २५.० |
| वाहतूक-व्यापार-बँकिंग-विमा इ. चें उत्पन्न | ९९९ | २१.५ |
| एकंदर उत्पन्न | ४६३१ | १०० |

वरील वर्षीं दर माणशीं सरासरी वार्षिक उत्पादन प्राथमिक धंद्यांत रु. १४८ झालें, उद्योगधंद्यांत रु. ३८५ झालें व वाहतूक-व्यापार बँकिंग-इ. धंद्यांत रु. १९२ झालें. उद्योगधंद्याचें दर-माणशीं उत्पन्न सर्वांत जास्त आहे. कारण कापड, पोलाद, ताग, सिमेंट, साखर इ. धंदे आधुनिक पद्धतीवर उभारलेले आहेत व उत्पादनाच्या बाबतींत कांहीं तरी प्रगति झालेली आहे. परंतु व्यापार-वाहतूक-बँकिंग इ. चें उत्पन्न रु. १९२ इतकें बेताचें दिसतें. याचे मुख्य कारण ९० टक्के लोकसंख्या राहत असणाऱ्या ग्रामीण विभागांत

---

२ व्यवसायदृष्ट्या वर्गीकरण (दर शंभर लोकांमागें)

| देशाचें नांव | प्राथमिक उत्पादन | औद्योगिक उत्पादन | व्यापार-वाहतूक-विमा-बँकिंग इ० |
|---|---|---|---|
| अमेरिका | १९.३ | ३१.१ | ४९.६ |
| ब्रिटन | ६.४ | ४३.९ | ४९.७ |
| जर्मनी | २४.३ | ३८.५ | ३७.२ |
| फ्रान्स | २५.० | ३९.७ | ३५.३ |
| जपान | ५०.३ | १९.५ | ३०.२ |
| हिंद | ६५.६ | १०.६ | २३.८ |

या धंद्यांची वाढ अगदींच बेताची झाली आहे, विशेषतः विमा व बँकिंग हे धंदे खेडेगांवांपर्यंत जवळजवळ पोंचलेलेच नाहींत. मुंबई, कलकत्ता, अहमदाबाद इ. औद्योगिक शहरांतच अशा प्रकारच्या धंद्यांचा विशेष प्रसार झाला असून तेथें या धंद्यांतील लोकांचें दर माणशीं उत्पन्न वरच्या पातळीचें आहे. या गोष्टी परिस्थितीच्या दृष्टीनें लक्षांत घेतल्या पाहिजेत.

व्यापार–वाहतूक–बँकिंग–विमा या स्वरूपाच्या धंद्यांच्या उत्पादनाचें आणखी पृथक्करण पुढें दिलें आहे. ( १९४८–४९ )

| | दशलक्ष रुपये |
|---|---|
| सरकारी नोकरवर्गाचें उत्पन्न | २१३३ |
| व्यापार, वाहतूक, बँकिंग, विमा | २३९६ |
| स्वतंत्र व्यवसाय करणारे ( डॉक्टर इ. ) | ७९९ |
| घरकाम करणाऱ्या नोकरवर्गाचें उत्पन्न | ६४० |
| घरें, इमारती इ. मालमत्तेचें उत्पन्न | २०७६ |
| इतर किरकोळ उत्पन्नें | १९४७ |
| एकूण उत्पन्न | ९९९१ |

## आपल्या आर्थिक प्रश्नांचें स्वरूप

हिंदची आर्थिक परिस्थिति विचारांत घेतांना पांच लक्ष खेडीं व तेथें राहणाऱ्या जनतेच्या राहणीचें मान या गोष्टी प्रामुख्यानें विचारांत घ्याव्या लागतात. याचा परिणाम असा होतो कीं, आर्थिक परिस्थितीचें चित्र हें मुंबईसारख्या शहरांत राहणाऱ्या जनतेच्या परिस्थितीचें चित्र नसून ग्रामीण विभागांतील जनतेचें चित्र असतें. डॉक्टर लोकांचें प्रमाण, शिक्षकवर्गाचे प्रमाण, विमा उतरविणाऱ्या लोकांचें प्रमाण, बँकांचें प्रमाण, दर चौरस मैलामागें वाहतुकीच्या रस्त्यांचें प्रमाण इत्यादि सर्व गोष्टींचें प्रमाण लोकसंख्येच्या मानानें आपल्या देशांत अगदींच अल्प आहे. आर्थिक प्रगति घडवून आणावयाची म्हणजे या प्रत्येक बाबतींतले आंकडे आपण वाढविण्याचा प्रयत्न केला पाहिजे. विपुल लोकसंख्येमध्यें सुखसोयी निर्माण करणारीं साधनें उपलब्ध करून देणारे लोक यांचें प्रमाण हिंदमध्यें अगदींच अल्प आहे. जीवनाशीं संबंध येणाऱ्या या प्रत्येक गोष्टीचें स्वरूप पूर्णपणें बदलल्याशिवाय आर्थिक प्रगति साध्य करण्याचा प्रश्न केव्हांहि सुटणार नाहीं. हिंदचा आर्थिक प्रश्न हा एखाद्या धंद्याचें उत्पन्न वाढविणें इतका साधा प्रश्न नाहीं. आजच आपण सिमेंट व मीठ या बाबतींत स्वयंपूर्ण आहोंत. कापड, साखर व पोलाद यांचें उत्पन्न वाढवितां येईल. परंतु अशा प्रकारें कांहीं उद्योगधंद्यांचें उत्पन्न वाढवून हिंदच्या आर्थिक जीवनाचा प्रश्न सुटण्यासारखा नाहीं. तर तो योग्य रीतीनें सोडविण्यासाठीं प्रथम वाहतुकीच्या रस्त्यांची व साधनांची वाढ केली पाहिजे, डॉक्टरी मदत व शिक्षण या गोष्टी प्रत्येकाच्या कक्षेंत आणल्या पाहिजेत, बँका व विमा यांचा प्रसार खेडेगांवांतील लोकांत केला पाहिजे. चांगल्या प्रकारच्या वाचनाची व कलेची आवड जनतेमध्यें निर्माण केली पाहिजे. कारण यावर अवलंबून असणारे चित्रकला, गायन, खोदकाम इ० धंदे असतात. प्रवासाची आवड लोकांमध्यें निर्माण केली पाहिजे व कौटुंबिक जीवनांत शक्य त्या सुखसोयींची तरतूद केली पाहिजे. असें होईल त्याच वेळीं आर्थिक जीवनाची सर्व प्रकारें प्रगति होईल व त्याचा परिणाम म्हणून सर्वसाधारण जनतेचें वार्षिक सरासरी उत्पन्न वाढलेलें दिसेल. कांहीं प्रमुख उद्योगधंद्यांची कारखानी धंदे किंवा बैठे उद्योगधंदे म्हणून वाढ करणें एवढाच आपल्यापुढील प्रश्न नसून, जीवनाचीं विविध दालनें खेडेगांवांतून राहणाऱ्या ९०टक्के जनतेला खुलीं करून देणें हा आजचा मुख्य प्रश्न आहे.

प्राथमिक स्वरूपाच्या उत्पादनांत सुमारें दोन-तृतीयांश लोक आहेत, हा हिंदच्या अर्थव्यवस्थेमधला महत्त्वाचा दोष आहे. उद्योगधंद्यांचीहि वाढ व्हावी तितकी झालेली नाहीं. व्यापार-वाहतूक-बँकिंग-विमा यांसारख्या व्यवसायांत फारच थोडे लोक आहेत, व या सर्व व्यवसायांचें स्वरूप अजून पुष्कळ प्रमाणांत प्राथमिक स्वरूपाचें आहे. मोटारीचे रस्ते, जलवाहतुकीचे मार्ग यांची पुष्कळच वाढ होण्याला अवसर आहे. हिंदमध्यें दर माणशीं सरासरी बँकेंतील ठेव फक्त रु. १२ इतकी अल्प आहे. अमेरिका व इंग्लंड यांचा बँकेंतील ठेवीचा दर माणशीं आंकडा अनुक्रमें रु. ११०५ व रु. ११०३ असा आहे. जपानमध्येंहि हा आंकडा रु. २२९ आहे. या आंकड्यांवरून बँकिंगची वाढ










खेडेगांवांत होणें किती आवश्यक आहे हें दिसून येतें. दुसऱ्या महायुद्धाचा परिणाम म्हणून खेडे-गांवांत राहणाऱ्या शेतकरीवर्गाचें उत्पन्न कांहीं प्रमाणांत वाढलें आहे असें भांडवदारांचें म्हणणें आहे. गेलीं तीन-चार वर्षें हिंदमध्यें भांडवलाचा तुटवडा भासत आहे याचें एक कारण शेतकरी-वर्गामध्यें उद्योगधंद्यांत अल्प प्रमाणांत भांडवल गुंतविण्याची किंवा पैसा शिल्लक टाकण्याची वृत्ति नाहीं, असें सांगण्यांत येतें. या म्हणण्यांत थोडासा तथ्यांश आहे व या दृष्टीनेंहि ग्रामीण विभागांत बँकांचा प्रसार होणें अगदीं आवश्यक आहे. या प्रश्नाकडे सरकारचें लक्ष गेलें असलें तरी अद्याप या बाबतींत कांहीं कृति झालेली नाहीं, व रूरल बँकिंग चौकशी कमिटीच्या शिफारशींची अंमल-बजावणी झालेली नाहीं. त्याचप्रमाणें विम्याचा प्रसारहि अद्याप शेतकरीवर्गांत झालेला नाहीं. खेडेगांवांतील लोकांना आकर्षक वाटतील अशा रु. २५० व रु. ५०० च्या विमा पॉलिसी रूढ झाल्या पाहिजेत. बँकिंग व विमा या दोनहि धंद्यांना खेडेगांवांत फार मोठा अवसर आहे. मात्र या धंद्यांचा खेडेगांवांत प्रसार करतांना तो खेड्यांतील लोकांना आकर्षक होऊन परवडेल अशा प्रकारांनीं केला पाहिजे. या दोन धंद्यांच्या प्रसारामुळें उद्योग-धंद्यांना पर्यायानें भांडवल मिळणें शक्य होईल. जलवाहतुकीला तर हिंदच्या किनाऱ्यावर व परदेशाशीं होणाऱ्या व्यापाराच्या वाहतुकीच्या बाबतींत फार मोठा अवसर आहे. मालाची वाहतूक करून डच व इटालियन लोकांनीं पुष्कळ पैसा मिळविला आहे.

आपल्या आर्थिक प्रश्नांचा विचार करतांना व ते सोडवितांना विशेषतः खेडेगांवांतील आर्थिक जीवन ज्या ज्या गोष्टींमुळें सुधारूं शकेल अशा तऱ्हेच्या गोष्टींना व उपक्रमांना सुरुवात करून आर्थिक प्रगतीला पोषक होईल असें वातावरण निर्माण करण्यावर भर दिला पाहिजे. हिंदची अर्थ-व्यवस्था आज अशा मर्यादेला पोंचली आहे कीं, शेतीचें उत्पादन वाढवून व कांहीं उद्योगधंद्यांचें उत्पादन वाढवून आपल्या आर्थिक जीवनाचे प्रश्न सुटणार नाहींत. तर सर्वांगीण आर्थिक प्रगति साध्य करण्यासाठीं व्यापार-वाहतूक, विमा-बँकिंग इ. स्वरूपाच्या व्यापाराचें लोण ग्रामीण जनतेपर्यंत पोंचविलें पाहिजे व आर्थिक जीवनाला पोषक होईल असें वातावरण प्रयत्नपूर्वक देशाच्या प्रत्येक भागांत सुरू केलें पाहिजे.

---

## प्रतिसृष्टीच्या तुझ्या गर्जना !

प्रतिसृष्टीच्या तुझ्या गर्जना
कानीं येती अनेक वेळां
नवे पंथ अन् नव्या घोषणा
तीच जुनी रे प्रतारणा पण !

ध्यानास्थींना कधीं चघळिलें
स्त्रीमोहानें तप भंगियलें
कधिं इंद्रानें वश तुज केलें
प्रतिसृष्टि मग व्हावी कोठून ?

क्षात्रर्षीचा तूं ब्रह्मर्षि
अगाध महिमा दिगंत कीर्ति !
चांडाल परी चांडालच रे
दीन बापडे अधांतरावरि

--जयंत जोग








प्रा. दे. अ. दाभोलकर

# "मला असें सामर्थ्य दे—!"

'कॉरोनेट' या इंग्रजी मासिकाच्या सप्टेंबर १९५१ च्या अंकांत रे. नॉर्मन व्हिन्सेंट पील यांनीं आपल्या आयुष्यांतील एक प्रत्यक्ष रोमांचकारी अनुभव निवेदन केला आहे. त्याचा अनुवाद पुढें दिला आहे :

"युद्धकाळांतील गोष्ट. नाझी लोकांनीं हॉलंडवर स्वारी केलेली होती. स्टाटेनडाम ही अमेरिकेशीं वाहतूक करणारी सुंदर प्रवासी आगबोट नाझी विमानांनीं बॉम्बफेक करून रॉटरडॅम बंदरांतच उद्ध्वस्त करून टाकलेली होती. युद्धकालीन परिस्थितीमुळें प्रवासी वाहतुकींतून ही बोट काढून घेण्यांत आलेली होती. याच वेळीं या बोटीचा कप्तान जॉर्ज बॅरेंडसे हा दुसऱ्या एका बोटीवरून अमेरिकेंत आलेला होता.

"जॉर्ज अमेरिकेंत येऊन पोहोंचला त्या वेळीं जवळजवळ एक-तृतीयांश रॉटरडॅम शहर धुळीला मिळालेलें होतें. जॉर्जची बायको आणि मुलगा हॉलंडमध्येंच होतीं. अमेरिकेंतून आपल्या बायकोचा व मुलाचा शोध घेण्याचा जॉर्जनें खूप प्रयत्न केला परंतु त्याला यश आलें नाहीं. तीं जिवंत आहेत, जखमी आहेत, परागंदा आहेत, कीं मृत्युमुखीं पडलीं आहेत हेंहि कळणें शक्य नव्हतें.

"अशा विलक्षण करुणभीषण परिस्थितींत १९४० च्या मे महिन्यांत एका रविवारीं सकाळीं जॉर्ज माझ्या चर्चमध्यें रविवारच्या प्रार्थनेसाठीं आला. जॉर्जला प्रार्थनेसाठीं मंदिरांत आलेला मीं पाहिला आणि त्याला बरें वाटावें म्हणून त्या दिवशीं प्रार्थनेसाठीं निवडलेलीं गीतेंहि मी बदलून नवीन घेतलीं. 'तूंच दयाघन युगायुगांतिल दीनांचा आधार', 'तुझाच एक आसरा, अतूट नीट ईश्वरा' या धीरगंभीर गीतांच्या ध्वनींनीं वातावरण भरून गेलें. शेवटीं डच लोकांचेंहि एक करुणसुंदर गीत सर्व लोकांनीं म्हटलें.

"जॉर्जच्या डोळ्यांतून अलोट अश्रू वाहत होते. अन्तःकरणांतून अचल श्रद्धा ओसंडत होती.

"त्यानंतर जॉर्ज आमच्या घरीं जेवावयास आला. त्या वेळचा तो अमर प्रसंग मी कधींहि विसरणार नाहीं. एका उदात्त आत्म्याचें दर्शन त्या दिवशीं मला झालें. जॉर्जच्या आगबोटीविषयीं, त्याच्या कुटुंबाविषयीं आमचें बोलणें सुरू होतें. जॉर्जच्या अन्तःकरणांतील वेदनांची कल्पना कुणाला येऊं शकेल ! परंतु या वेदनांनीं व्याकुळलेल्या जॉर्जनेंहि माझ्या विनंतीला मान देऊन भोजनापूर्वीच्या प्रार्थनेला सुरुवात केली. 'ईश्वरा, कुणाचाहि द्वेष न करण्याचें सामर्थ्य मला दे. राष्ट्राराष्ट्रांतून युद्धाचा वणवा पेटवीत जाणाऱ्या या लोकांच्या विचार, आचार व उक्तींना तूंच योग्य असें वळण लाव. तुझी इच्छाच तेवढी शेवटीं एक प्रमाण. तुझ्या प्रभुराज्याचा उदय आतां जगांत होऊं दे !'

"आंतडें पिळवटून जॉर्जच्या मुखांतून एकेक शब्द स्पष्ट सावकाश बाहेर पडत होता : 'ईश्वरा, माझ्या बायकोची आणि मुलांची काळजी घे. माझी स्त्री माझी होण्यापूर्वींहि तुझेंच लेंकरूं होती. आणि माझा मुलगा मला मिळण्यापूर्वीं तुझ्याकडेच होता. आजहि त्यांचें रक्षण: तुझ्याच हातीं आहे. माझी तुझ्यावर अचल श्रद्धा आहे. तुला योग्य वाटेल तें तूं कर.'

"जॉर्जची प्रार्थना पुढें चालूंच होती. त्याच्या विशुद्ध आत्म्याची ती एक अलौलिक भरारी होती : 'ईश्वरा, हिट्लरसाठींहि मी तुझ्याकडे करुणा भाकतों. हिट्लरला योग्य असें मार्गदर्शन कर. आज लक्षावधि लोकांच्या जीवनमरणावर त्याची सत्ता आहे. त्याच्या अंतःकरणांत तुला नाहीं का बदल करतां येणार ? हिट्लरविषयींचा द्वेष माझ्या अन्तःकरणांत निर्माण होणार नाहीं असें सामर्थ्य माझ्या अंतःकरणाला दे. हे शब्द केवळ दांभिक न ठरतां यथार्थ ठरतील असें सामर्थ्य तरी तुझ्यावांचून अन्य कोण देऊं शकेल ?'

"आमच्या शेजारीं, टेबलाशीं बसणारा हा उदार आत्मा, हा खरा ख्रिश्चन—त्याच्यापुढें आदरानें, भक्तिभावानें माझें मस्तक नम्र झालें आणि मीं मनोमन त्याला प्रणाम केला."










श्री. द. वि. गा ड गी ळ

# उर्वशी आणि पुरूरवा यांच्या कथेंतील गूढ

उर्वशी आणि पुरूरवा यांच्या प्राचीन कथांतून कांहीं गूढ भाग असून त्याचा अर्थ नीट लागत नाहीं. तो लावण्याचा प्रस्तुत लेखांत अल्पसा यथामति प्रयत्न करीत आहे.

उर्वशी व पुरूरवा यांच्या कथेंतील निरनिराळ्या भागांचे उल्लेख ऋग्वेद १०.९५, शतपथ ब्राह्मण ११.५.१, श्रीभागवत स्कंध ९.१४, देवीभागवत स्कंध १.१३ या ग्रंथांतून आले आहेत. या उल्लेखांच्या साहाय्यानें उर्वशी-पुरूरवा यांची कथा थोडक्यांत अशी सांगतां येईल :

उर्वशी राजा पुरूरव्याला सोडून जाते. तो तिची परत येण्याबद्दल प्रार्थना करतो, "न आलीस तर मी आपणांस लांडग्याकडून भक्षण करवीन" वगैरे बोलतो. उर्वशी त्याला सांगते कीं, "आम्ही अप्सरा स्वैरिणी असतों, आमचें हृदय लांडग्यासारखें असतें. तेव्हां तूं परत जा. मी परत येत नाहीं. तूंहि लांडग्याच्या मुखांत पडून जीव देऊं नकोस. तूं यज्ञयाग कर व स्वर्गप्राप्ति करून घे. म्हणजे तेथें तुला आमच्याबरोबर रममाण होतां येईल. सांप्रत तूं मृत्युवश आहेस, माझा अभिलाष सोडून दे." (ऋग्वेद १०.९५)

भागवत, देवीभागवत, आणि शतपथ ब्राह्मण या ग्रंथांतून या कथेतील बाकी इतर दुवे आहेत ते असे :

इंद्रसभेमध्यें नारदाच्या मुखानें पुरूरव्याचें वर्णन ऐकून उर्वशीला त्याची इच्छा झाली. तिला मित्रावरुणांच्या शापामुळें मृत्युलोकीं यावयाचेंच होतें. तेव्हां दोन्हीं कामें उरकण्याची इच्छा ठेवून ती पुरूरव्याकडे आली. तिला पाहून राजा मोहित झाला व त्यानें तिची याचना केली. त्याच्या बोलण्याचा तिनें स्वीकार केला. पण उर्वशीनें त्याच्याबरोबर राहण्याबद्दल पुढील अटी घातल्या : "१ माझे दोन 'उरणकौ' (लहान मेंढे) तुझ्याजवळच ठेव म्हणून ठेवतें. २ घृत हें माझें भक्ष्य असावें. ३ मैथुन-प्रसंगाशिवाय केव्हांहि तुला नग्नावस्थेंत पाहाणार नाहीं. या अटी तूं मोडल्यास तर मी निघून जाईन." (वरील अटींचा ऋग्वेदांत उल्लेख नाहीं.)

या तिन्ही अटी राजाकडून पूर्ण पाळल्या गेल्या नाहींत म्हणून उर्वशी पुरूरव्याला सोडून स्वर्गांत गेली. वरील तीन अटींवर ती त्याजपाशीं चार वर्षें होती. ह्यांत रतिसंभोग असा पूर्णपणें एकदांच झाला व तेवढ्यानें ती तृप्तहि झाली, एवढेंच ऋग्वेदांत म्हटलें आहे. देवी-भागवत व श्रीभागवत यांमध्यें, त्यानें अनेक वर्षेंपर्यंत तिच्याशीं क्रीडा केली, स्वतः राज्यशासनाचें कामहि तो करीनासा झाला व पूर्ण विषयलंपट झाला, असें म्हटलें आहे.

इंद्रानें पाहिलें कीं हा राजा रतिक्रीडा सोडीत नाहीं. तेव्हां त्यानें गंधर्वांना सांगितलें कीं, "वाटेल ती युक्ति लढवून मेंढे पळवून आणा व राजा नग्नस्थितींत उर्वशीला मैथुनरहित अवस्थेंत दिसेल असें करा. म्हणजे उर्वशी माघारी येईल."

इंद्राच्या सांगण्यावरून गंधर्व आले. त्यांनीं मेंढे चोरून नेले. ते मेंढे आक्रोश करूं लागले. तें ऐकून उर्वशीला दुःख झालें. व तिनें राजाची नपुंसक म्हणून निर्भर्त्सना केली. तेव्हां तो मेंढयांना धरण्याकरितां नग्नावस्थेंतच बाहेर पडला. इकडे गंधर्वांनीं विजेचा प्रकाश पाडला, त्यायोगें उर्वशीला









अनुक्रमणिका

# उर्वशी आणि पुरूरवा यांच्या कथेंतील गूढ

राजा बाहेरचे बाजूस नग्नावस्थेंत दिसला. अशा तऱ्हेनें राजाच्या हातून दोन मुख्य अटी मोडल्यामुळें उर्वशी त्याला सोडून चालती झाली. त्यानंतर राजा वेड्यासारखा हिंडत असतां त्याला उर्वशी दिसली. ती त्याला म्हणाली : "एक वर्षानें तुला एकदांच माझा सहवास घडेल. तुजपासून मला पुत्र झाला आहे तो मी तुला देईन. तूं स्वगृहीं जा. तेथें गंधर्वांची आराधना कर. ते तुला अग्निस्थाली देतील. त्यांत तूं इष्टि कर म्हणजे तुला आणखी अपत्यें होतील." याप्रमाणें त्यानें केलें. त्याला आणखी पुत्र झाले. नंतर तो स्वर्गाला गेला.

अशी ही थोडक्यांत कथा आहे.

'उरणकौ' हा शब्दप्रयोग भागवत व देवी भागवत यांत आला आहे. 'उरणक' म्हटल्यानें त्याचा अर्थ कोणीं 'कोंकरें' असा केला आहे; तर कोणीं 'मेंढे' असा केला आहे. पण शतपथ-ब्राह्मणांत 'उरणक' असा शब्दप्रयोग नसून 'उरणा' असा प्रयोग आहे. तेव्हां कै. काशीनाथ वामन लेले यांनीं देवी-भागवताच्या भाषान्तरांत मेंढे म्हणून जो अर्थ केला आहे तोच बरोबर दिसतो.

उर्वशीच्या पहिल्या अटींत ती राजाला म्हणते : "माझे हे दोन मेंढे तुजजवळ ठेव म्हणून ठेवतें. हे जर नाहींसे झाले तर करार मोडला असें होईल." पूर्वीं आख्यानांत सांगितलेंच आहे कीं, मेंढे गंधर्वांनीं चोरून नेले. आतां प्रश्न असा सहजगत्या उद्भवतो कीं उर्वशी ही अप्सरा आहे. तिला कांहीं कमी नाहीं. अशा स्त्रीनें या राजाजवळ मेंढे हे क्षुल्लक दिसणारे दोन प्राणी ठेव म्हणून कां ठेवले असावेत ? हे प्राणी तर मुळींच मौल्यवान् नाहींत. खरोखर बाजारांत विक्रीला काढले तर त्यांची किंमत अगदींच क्षुल्लक येईल. असें जर आहे तर मेंढेच कां ठेवले ? व तेहि एक नसून दोन कां म्हटलें ? दोनच कां ? एकच कां नाहीं ? शिवाय ते शतपथ-ब्राह्मणांत वर्णन केल्याप्रमाणें निजण्याच्या पलंगाला बांधिलेले असत.

आतां आपण मेंढे या शब्दाकडे वळूं व त्यांत काय गूढ आहे तें पाहूं; म्हणजे मेंढे कां ठेवले व ते दोनच कां तें समजेल. संस्कृतांत 'मेढ्र' हा शब्द वृषणवाचक आहे. तसाच त्याचा अर्थ मेंढाहि आहे. 'उरण' या शब्दाचा अर्थ मेंढा आहे. 'मेढ्र' म्हणजे वृषण व मेंढा असा अर्थ आहे. प्रस्तुत कथेंत उरण हा मेंढावाचक शब्द घातला आहे. त्याचा सरळ भाषान्तराप्रमाणें अर्थ मेंढा हाहि बरोबर आहे. पण काव्य या दृष्टीनें वृषण शब्द कानाला उचित लागणार नाहीं व अर्थबोध झाला पाहिजे म्हणून वृषण शब्द न वापरतां, तसेंच मेढ्रहि शब्द न वापरतां, तदर्थवाचक व अर्थपूर्ण असा 'उरण' शब्द वापरला आहे.

संभोगक्षम असणाऱ्या प्राण्यांचा वृषणाशीं अत्यंत निकटचा व अत्यंत जरूरीचा संबंध आहे, हें वाचकांच्या ध्यानीं येईलच. उत्तम दांडगा घोडा इतर सर्व कामाला उत्तम रीतीनें उपयोगी पडावा म्हणून त्याची खच्ची करतात. तीच गोष्ट बैलाच्या बाबतींत, कुत्र्याच्या बाबतींत दिसते. असे खच्ची केलेले प्राणी इतर सर्व कामें नीट करतात. पण ते प्रजोत्पादनास नालायक ठरतात. तोच प्रकार मानवांत आहे. मनुष्यानें रतिक्रीडेचा अतिरेक केला तर वासना प्रबल असूनहि तो नपुंसकच झालेला असतो. तो वृषण गमावल्यासारखाच असतो. तसाच प्रकार या आख्यानांत सूचित असावा. उर्वशी अतिसुंदर, राजा तरुण. अशा स्थितींत पुराणकारांच्या मतें फार वर्षें त्यानें तिजशीं रात्रंदिवस रतिक्रीडा केली. इतकेंच नाहीं तर राज्यशकट चालविण्याकडेहि दुर्लक्ष केलें. मेंढे गंधर्वांनीं नेले याचा अर्थ वृषणांची कार्यक्षमता गेली. अशा शक्तिहीन माणसाजवळ राहण्यांत मतलब नाहीं. म्हणून उर्वशीनें राजाची नपुंसक म्हणून निर्भर्त्सनाहि केली व ती निघून गेली. गंधर्वांनीं मेंढे नेले यामागील गूढार्थ असा असावा. राजा स्त्रीलंपट झाला होता. राज्यशासनाकडे त्याचें लक्षहि मुळींच नव्हतें. त्याला ठिकाणावर आणावयाचें होतें. इंद्र ही क्षत्रिय-देवता आहे. पुरूरवा हा क्षत्रिय होता. त्या क्षत्रियाला शुद्धीवर आणून राज्यकारभार नीट चालावा अशी इच्छा इंद्राला असणें साहजिकच होतें. त्याकरितां त्यानें गंधर्वांची योजना केली. गंधर्व या शब्दाचे अनेक अर्थ आहेत. त्यांत 'सूर्य' असा अर्थ आहे व 'ज्ञान' असाहि अर्थ आहे. नग्न अवस्थेंत पुरूरवा उर्वशीला दिसावा म्हणून गंधर्वांनीं








विजेचा प्रकाश पाडला असें वर्णन आहे. याचा गूढ अर्थ असा कीं त्यांनीं पुरूरव्यामध्यें ज्ञानरूपी प्रकाश पाडला.

नंतर राजा अगदीं वेडा झाला आहे असें पाहून तो कायमचा कामांतून जाऊं नये म्हणून, 'एक वर्षानंतर तुला एकदां भेटेन व एक वेळेला तुला माझा सहवास घडेल' असें त्याला सांगून तिनें त्याला वाटेला लावलें. एक वर्षानंतर भेट झाली. पुन्हां तो मोहांत पडण्याच्या बेतांत असतांच तिनें त्याला गंधर्वांची उपासना करण्यास सांगितलें :

'गंधर्वानुपधावेमांस्तुभ्यं दास्यन्ति मामिति ।

... ... ...

तस्य संस्तुवतस्तुष्टा अग्निस्थालीं ददुर्नृपः ।

उर्वशीं मन्यमानस्तां सोऽबुध्यत चरन्वने ॥'

—श्रीभागवत ९·१४·४२.

त्या स्थालीलाच उर्वशी समजून तो भटकत राहिला. तो इतका स्त्रीलंपट झाला होता कीं, त्याला त्यांतील गूढार्थ उमगला नाहीं. कालान्तरानें त्याला उमगलें कीं, ही जी अग्निस्थाली दिली आहे त्याचा अर्थ आपण वेद उमजून घेतले पाहिजेत असा आहे. मग त्यानें ग्रामीण अग्नि न घेतां शमीची फांदी घेऊन ती अधरारणि म्हणजे उर्वशी कल्पून, अश्वत्थाची फांदी ही उत्तरारणि म्हणजे पुरूरवा कल्पून मंथन केलें. त्यापासून जो अग्नि उत्पन्न झाला तोच पुत्र असें त्यानें मनांत योजिलें. नंतर जितेंद्रिय राहून त्यानें त्या अग्नीची आहवनीय, गार्हपत्य, दक्षिणाग्नि अशा तीन अग्नींत विभागणी करून यथासांग यज्ञ केले व दीर्घकालपर्यंत राज्य केलें.

अग्नि व त्याची उपासना यांचें महत्त्व प्राचीन ग्रंथांतून वर्णिलें आहे. त्या उपासनेंतून, ब्रह्मचर्यव्रतानें राहिल्यास शरीरांत जोरदार अग्नि उत्पन्न होतो. व तोच वीर्य उत्पन्न करितो. उदा.

'होता निषत्तो मनोरपत्ये स चिन्न्वासां पती रयीणाम् ।

इच्छन्त रेतो मिथस्तनूषु संजानत स्वैर्दक्षैरमूराः ॥'

—ऋ. १·६८·४

[ 'मनूच्या अपत्यांच्या समुदायांत हा अग्नि 'होता' ( यज्ञसंपादक ) म्हणून अधिष्ठित झाला आहे. शरीरांत वीर्य असावें अशी उभयतांना इच्छा होते, तेव्हां त्यांच्यावर मनोभंग होण्याचा प्रसंग न येतां त्यास आपल्या शक्तीच्या योगानें संततिलाभ करून घेतां येतो.' ] या कारणास्तव पुरूरव्याला अग्नीची उपासना करावयास सांगितलें.

---

## दोन कणिका

मृत्तिके ! दिलें मीं जीवनऋण कां तुजला ?
सव्याज परत तें करावेंस तूं मजला !
विपरशी रीत ही व्यवहारांतिल साधी !
सव्याज कोठचें ? मुद्दलही नच परतें ?
ही दिवाळखोरी ! अद्दल मजला घडते ! !

* * *

म्हणतात, "निरागस बाल्य असे या जगतीं.
कीं प्रेमच केवल ! षड्रिपु त्या नच शिवती
बालकें प्रभूची मंगलमय जणुं मूर्ति !"
प्रभु वास करी जर जन्मतःच हृदयांत —
मग जातो कैसा सोडुन तारुण्यांत ?

—नृसिंहाग्रज



अनुक्रमणिका








# दिवाकरांचें आणखी एक गुणग्रहण!

श्री. रा. रा. संपादक ' नवभारत ' यांस,

स. न. वि. वि.

आपल्या मासिकाच्या ऑक्टोबर १९५१ च्या अंकांत ' दिवाकरांचें गुणग्रहण ' करणारीं तीन पत्रें नुकतींच पाहाण्यांत आलीं. कोल्हटकर व गडकरी ह्या गुरु-शिष्यांच्या ' कारकून ' या नाटकाविषयींच्या गुणग्राहकतेंतील तफावत पाहून गडकऱ्यांच्या एका मार्मिक कोटींतील खोंच प्रत्ययाला आली. कोल्हटकरांच्या ' सहचारिणी ' नाटकाबद्दल मतप्रदर्शन करीत असतांना गडकरी गुरुवर्यांना म्हणाले : " तात्या, ' प्रेमसंन्यास ' मधल्या अर्पणपत्रिकेंत, आपणांला मी गुरु मानीत असल्यामुळें माझे दोष मीं आपल्या पायांवर अर्पण केले होते. परंतु त्या दोषांनीं पायापासून निघून आतां डोक्यावर परिणाम केलेला दिसतो ! "

गडकऱ्यांच्या ह्या मार्मिक उद्‌गारांचें स्मरण असल्यानें ' कारकून ' नाटिकेसंबंधीं ' बक्षिससमारंभासारख्या प्रसंगीं प्रयोग ' करण्याबद्दलची कोल्हटकरकृत शिफारस वाचून फारसें आश्चर्य वाटलें नाहीं. परंतु कोल्हटकरांच्या या शिफारशीलाहि मागें टाकणारी अशी एक जी 'कारकून' नाटकाची संभावना नुकतीच माझ्या वाचनांत आली, ती पाहून मात्र आश्चर्याचा धक्काच बसला ! भालचंद्र- ( ग. ना. टिपणीस ) कृत ' घटकेचीं नाटकें अथवा छोटीं सामाजिक प्रहसनें ' ( १९३२ ) या पुस्तकाचे प्रस्तावनालेखक श्री गो. गो. अधिकारी ह्यांनीं ही संभावना केलेली आहे. ह्या संभावनेंतील महत्त्वाचा भाग आपल्या मासिकाच्या वाचकांकरितां पुढें उद्धृत करीत आहे :

" शाहूनगरवासी नाटकमंडळी, वेलणकर यांची नाटकमंडळी वगैरे नाटक-कंपन्या नाटकाच्या शेवटीं फार्स करुन दाखवीत...कांहीं वर्षांपूर्वी महाराष्ट्र नाटकमंडळीनें नाट्यछटालेखक दिवाकर यांनीं लिहिलेलें, पूर्वीच्या शब्दांत सांगावयाचें तर फार्स किंवा आजच्या शब्दांत सांगावयाचें तर घटकेचें नाटक ' कारकून ' रंगभूमीवर आणलें होतें. हे फार्स मुख्य नाटकाचा प्रयोग संपल्यावर प्रयोगीत असत. " ( पृ. १५ )

मी नाट्यवाङ्मयाचा एक अभ्यासू आहे. मराठींतील बहुतेक सर्व फार्स व श्री. अधिकारी म्हणतात त्या पद्धतीचीं प्रहसनात्मक प्रकृतीचीं 'घटकेचीं नाटकें' मीं वाचलेलीं आहेत. फार्स व प्रहसन यांच्या तंत्ररचनेचें विवेचन करणारे इंग्रजी व संस्कृत ग्रंथहि मीं बारकाईनें वाचलेले आहेत. परंतु हें सर्व वाचन झाल्यावरहि दिवाकरांचें ' कारकून ' नाटक हें फार्स वा प्रहसन या संज्ञेस कसें पात्र होतें हें कांहीं ध्यानांत येत नाहीं. म्हणून आपल्या मासिकाच्या रसिक व विद्वान् वाचकांपुढें माझी ही वैयक्तिक शंका मांडीत आहे. निदान ज्यांच्या पत्रसंग्रहांतून आपण दिवाकरांचें गुणग्रहण करणारीं तीन मूल्यवान् पत्रें मिळविलीं आहेत, त्या श्री. त्र्यं. सी. कारखानिसांच्याकडून तरी महाराष्ट्र नाटकमंडळी ' कारकून ' नाटक फार्स म्हणून करीत असे कीं काय याविषयीं खुलासा मिळेल काय ? कोणत्या नाटकाच्या शेवटीं महाराष्ट्र नाटकमंडळी हा 'कारकुना'चा फार्स करीत असे ? श्री. गो. गो. अधिकारी यांच्यासारख्या मराठी वाङ्मयक्षेत्रांतील अधिकारी व्यक्तीकडूनच या बाबतींत कांहीं ' अधिकृत ' खुलासा मिळाला तर माझ्यासारख्या अभ्यासू वाचकावर फारच उपकार होतील.

कळावें.

१६ नोव्हेंबर १९५१

आपला नम्र
एक अभ्यासू








राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# सार संकलन

## हिंदुस्थानवरचें महान् संकट : अन्नाची तूट

हिंदुस्थानांतील अन्नधान्याचीं समस्या म्हणजे एक यक्षप्रश्नच आहे. त्या प्रश्नाचा उलगडा करून घेण्यासाठीं पं. नेहरूंनीं ॲग्रिकल्चरल ॲडव्हायझरी कमिशनचे अध्यक्ष लॉर्ड बॉइड-ऑर यांना १९४९ सालीं हिंदुस्थानांत बोलावून त्यांचा सल्ला घेतला होता. फिरून ते नुकतेच दिल्लीला आले तेव्हां 'फूड ॲन्ड फार्मिंग'च्या संपादकांनीं त्यांची मुलाखत घेतली असतां त्यांनीं जे उद्‌गार काढले, ते फार चिंतनीय आहेत. लॉर्ड बॉइड-ऑर म्हणाले :

" मोठमोठ्या राष्ट्रांच्या इतिहासांत असेच आणीबाणीचे प्रसंग आले आहेत. त्या परिस्थितीला कशा प्रकारें त्यांनीं तोंड दिलें यावरच त्यांचें भवितव्य अवलंबून राहिलें. त्यांनी परिस्थितीवर मात करून मार्ग काढला कीं ते परिस्थितीच्या दडपणाखालीं नामशेष झाले, यावरच त्यांचें महत्त्व अवलंबून आहे.

" आज हिंदुस्थानपुढें असाच आणीबाणीचा प्रसंग उभा आहे. त्यांतील प्रजेला सकस अन्न मिळत नाहीं आणि हिणकस अन्न खाणारी दुबळी प्रजा महापदाला पोंचणें अशक्य आहे. उलट जर हिंदुस्थाननें हें संकट झेललें आणि आपलें डोकें वर काढलें, तर हिंदी जनतेंत चैतन्ययुक्त निर्माणशक्ति पुन्हां उत्पन्न होईल आणि जगांतील समर्थ राष्ट्रांत त्याला मानाचें स्थान प्राप्त होईल. १९ व्या शतकांतील यूरोपनें व अमेरिकेनें आपल्या झगड्यांतून हाच धडा घालून दिलेला आहे.

" हिंदुस्थानांतील जमिनीचा कस आज फारच कमी झाला आहे. याचीं कारणें एक तर मशागतीकडे होणारें दुर्लक्ष आणि दुसरें, जमिनीची सारखी होणारी धुपणी हीं होत. याचा परिणाम असा होतो कीं, शेतीमध्यें पैदास कमी होते. यांतच सध्यांच्या लोकांच्या निःसत्त्व राहणीचें कारण सांपडतें. त्यामुळें जोम नाहींसा झाला आहे, सर्व तऱ्हेच्या उत्पादनावर बोजा आला आहे. मोबदला म्हणून कांहीं द्यायला नसल्यामुळें अन्नधान्य विकतहि घेतां येईनासें झालें आहे.

" पाश्चात्त्य देशांत जें सुधारलेलें शेतकीतंत्रज्ञान आहे त्याचा उपयोग केल्यास हिंदुस्थानांत गरजेपुरतें धान्य पैदा होऊं शकेल, एवढेंच नव्हे तर आधुनिक राहणीला आवश्यक असणारें वरच्या दर्जाचें अन्नहि लोकांना मिळूं शकेल. तेव्हां हें नवें तंत्र हिंदुस्थानला कितपत आत्मसात् करतां येतें यावरच या सर्व प्रश्नांचें उत्तर अवलंबून आहे. उत्तम शेतीला जरूर असणाऱ्या तिन्ही गोष्टी येथें आहेत. जमीन आहे, पाणी आहे आणि सूर्यप्रकाश आहे. तेव्हां तात्त्विक दृष्ट्या पाहतां हिंदुस्थानचे अन्नधान्याचे प्रश्न सुटले पाहिजेत.

" गेल्या युद्धांत ब्रिटनवर उपासमारीचें संकट आलें असतां तेथील सरकारनें आबालवृद्ध अशा सर्व नागरिकांना या प्रश्नाची जाणीव करून दिली आणि त्याचा परिणाम असा झाला कीं, फुलझाडांच्या बागा, हिरवळी आणि पडीत जमिनी यांवर अन्नधान्याची लागवड सुरू झाली. सांप्रतच्या संकटांतून निभावून जावयाचें असेल, तर हिंदुस्थाननें असाच उत्साह आणि जोम दाखविला पाहिजे. अन्नधान्याची तूट हाच पहिल्या नंबरचा शत्रु मानला पाहिजे. 'Dig for Victory', 'जयासाठीं जमीन खणा' हाच उपाय हिंदुस्थाननें अंमलांत आणला पाहिजे. नाहीं तर पराजय, मृत्यु आणि प्रजाविनाश हींच पुढें उभीं आहेत.

" भारतीय सरकारपुढें हेंच भगीरथ कार्य उभें आहे. अखिल जनतेंतील प्रत्येक व्यक्तीला अन्नविषयक संकटाची जाणीव करून देण्यांत जर








सरकार यशस्वी झालें तरच कांहीं निभाव लागेल. प्रत्येकजणानें या संकटाविरुद्ध झगडण्यास तयार झालें पाहिजे. तसें झाल्यास नवीन शेतकीतंत्राचा प्रसार आपोआप होईल आणि त्यामुळें पैदास वाढून लोकांना नीट खायला-प्यायला मिळूं लागेल, प्रजा सकस होईल आणि मग इतर प्रश्नहि हळूहळू सुटूं लागतील.

" पाश्चात्य शेतकीतंत्राचा येथें उपयोग करण्यांत अनेक अडचणी आहेतच. यांत्रिक नांगर, पेरणी-बेणणी-कापणीचीं यंत्रें, पंप, जंतुविनाशक रसायनें, आणि ' फर्टिलायझर्स् ' यांचा फारच मोठ्या प्रमाणांत पुरवठा व्हावयास पाहिजे. यासाठीं लागणारें चलन नसल्यामुळें ह्या गोष्टी पुरेशा प्रमाणांत विकत घेणें हिंदुस्थानला कठिण जाईल. म्हणून शेतकीबरोबर उद्योगधंद्यांचीहि वाढ झाली पाहिजे, आणि त्यांतून आधुनिक शेतकीतंत्राला लागणारीं यंत्रें, साधनें आणि रसायनें तयार झालीं पाहिजेत. हिंदुस्थानांत याबाबतींत योग्य मार्गानें प्रगति चालूं झाली आहे. पण ती पुरेशा प्रमाणांत आहे कीं नाहीं, तें मला अधिक निरीक्षणानंतरच सांगतां येईल."

## युरोपांत गांधीजींचा संदेश

श्री. नगीनभाई मणिलाल पारेख या नांवाच्या सद्‌गृहस्थांनीं श्री. किशोरलालभाई मश्रूवाला यांना एक पत्र लिहून, गांधींच्या कार्याचा व संदेशाचा परिणाम युरोपांत काय झालेला आहे, तें कळविलें आहे. त्या पत्रांतील कांहीं भाग ' शिक्षण अने साहित्य ' (नोव्हेंबर) मधून पुढें उद्‌धृत केला आहे:

" ऑक्सफर्डच्या रस्किन कॉलेजांत मी अभ्यास करीत आहे, व माझ्या सुटीच्या निमित्तानें मी सध्यां कॉन्टिनेंटवर आहे. कांहीं दिवसांपूर्वीं ऑस्ट्रिया-मध्यें ग्राझ येथें एका कांचेच्या वस्तूंच्या दुकानांत मला अनुभवायला मिळालेली गोष्ट या पत्रांत कळवीत आहे.

" दुकानांत शिरल्याबरोबर एका बाजूला ठेवलेल्या कांचेच्या हरतऱ्हेच्या पुतळ्यांकडे माझें लक्ष गेलें. तेथें सर्वांत मध्यभागीं मोठ्या आकर्षक पद्धतीनें ठेवलेला बापूंचा पुतळा जेव्हां मीं पाहिला, तेव्हां माझ्या आश्चर्याला सीमाच राहिली नाहीं. कुतूहलानें मीं सहज त्याची किंमत विचारली. तेव्हां दुकानाच्या संचालक बाईनीं सांगितलें, ' या संबंध दुकानांतील ही एकच वस्तु अशी आहे कीं जी विकण्यासाठीं नाहीं. आजपर्यंत दहा मागण्या येऊनहि आम्हीं हा पुतळा विकला नाहीं. एक प्रतीक म्हणून तो येथें ठेवलेला आहे. '

" मी भारतवासी आहे हें कळल्यावर त्या बाईनीं खुलासा करीत म्हटलें : ' गेल्या युद्धांत या दुकानाच्या मालकीणबाईचें घर व दुकान हीं दोन्ही जमीनदोस्त झालीं. युद्ध संपल्यावर त्या बाई जर्मनीला गेल्या असतां त्यांना गांधीजींची ही प्रतिमा आढळली. आणि लगेच त्यांनीं ती विकतहि घेतली. युद्धाच्या भीषणतेचा अनुभव त्यांनीं स्वतःच घेतलेला असल्यामुळें शान्तीच्या प्रतीकासमान असणाऱ्या गांधीजींच्या या प्रतिमेकडे पाहतांच त्यांना दिलासा मिळाला. हें दुकान पुन्हां बांधून झाल्यावर त्यांनीं ही प्रतिमा येथें आणून ठेवली आणि त्यांच्याच शब्दांत सांगावयाचें तर, जोंवर हें दुकान येथें उभें आहे तोंवर गांधीजींची ही कांचेची प्रतिमा शान्तीचा संदेश देत सदा सर्वदा या ठिकाणीं राहील. '

" युरोपांतील प्रवासांत जेव्हां जेव्हां अगदीं सामान्य माणसांशीं पांच मिनिटें बोलण्याची संधि मला मिळाली तेव्हां तेव्हां त्या माणसांनीं बापूजींचा उल्लेख केला नाहीं असें क्वचितच घडलें असेल ! आज मला मुळींच संदेह वाटत नाहीं कीं, युद्ध-पीडित युरोपांतील हजारों लोकांना बापूजींच्या जीवनसंदेशांतून आश्वासन व श्रद्धा प्राप्त होत आहे."

## नव चीनचें दर्शन

सर्वोदय अर्थशास्त्रांतील एक तज्ज्ञ व ग्रामोद्योग-संघाचे प्रमुख डॉ. जे. सी. कुमारप्पा लाल चीनच्या दुसऱ्या वाढदिवस-समारंभास हजर राहण्यासाठीं चीनला गेले होते. तेथून त्यांनीं आपल्या सहकाऱ्यांना जीं पत्रें पाठविलीं त्यांचा कांहीं भाग ' ग्राम-उद्योग-पत्रिके 'मध्यें प्रसिद्ध झाला आहे. त्यांतील कांहीं भाग पुढें दिला आहे :

" नवचीनचें जों जों मी अवलोकन करतों, तों तों तेथील लोकांच्या स्वभावाची अधिकाधिक प्रशंसा करावी असें मला वाटतें... येथें अन्न आणि

इतर जीवनावश्यक वस्तूंची रेलचेल आहे आणि किंमतीहि माफक आहेत. येथेंहि भाववाढ आहेच. परंतु सरकारनें त्यावर फार चांगल्या रीतीनें काबू ठेवला आहे. येथील नोकरशाही समजूतदार आहे. सामान्य जनतेचें त्यांना सदैव सहकार्य मिळत असतें, कारण दोघांचें उद्दिष्ट एकच आहे व त्याची त्यांना जाणीव आहे. येथील लोकांचे पोषाक एकाच तऱ्हेचे दिसतात आणि त्यांची राहणीहि एकाच प्रकारची आहे. सर्वांत श्रीमंत आणि सर्वांत गरीब यांच्यामध्येंहि फारसा फरक दिसत नाहीं. राष्ट्राध्यक्ष माओ यांना २८०० कट्टी बाजरी, राहयला घर आणि वापरायला मोटार एवढेंच मिळतें. एक कट्टी म्हणजे जवळ जवळ १·३ रत्तल. आपल्या चलनी रुपयांत हिशेब केला तर ह्या सगळ्याची किंमत महिना सहाशें रुपये होईल.

" दोन मंत्र्यांशीं बोलण्याची संधि मला मिळाली. त्यांना दरमहा सुमारें ४५० रुपये मिळत असतात. आमच्या मदतीसाठीं जे स्वयंसेवक होते त्यांना ह्या रकमेच्या ⅓ रक्कम मिळत होती. ...येथें नोकरांना घरदार, कपडे आणि अन्न मोफत दिलें जातें आणि वर खर्चासाठीं महिन्याकांठीं १०-१५ रुपये रोख दिले जातात....चीनचे नेते सामान्य जनतेप्रमाणें आपलें जीवन घालवितात याची ह्यावरून कल्पना येईल. आपल्याकडे १९३०–३२ मध्यें जो उत्साह होता, जी भावना होती तीच भावना आणि तोच उत्साह आज येथील जनतेंत आढळतो. ...आपल्याला वाटतें त्याप्रमाणें येथें रशियाचें संपूर्ण आधिपत्य दिसत नाहीं. "

### पूर्वग्रहांची मानसशास्त्रीय उपपत्ति

माणसाच्या मनांत घर करून बसणारे पूर्वग्रह किती भयानक स्वरूप धारण करतात तें हिटलरच्या राजवटींत आणि फाळणीनंतरच्या हिंदु-मुस्लीम कत्तलींत आपणांला पुरेपूर कळून आलें आहे. ती एक केवळ बुद्धिहीन समजुतींची गोष्ट आतां राहिली नाहीं. परंतु या सर्व पूर्वग्रहांमागील भूमिकांचें निदान व चिकित्सा मानसशास्त्रज्ञांनाहि अजून संपूर्णपणें करतां आलेली नाहीं. परंतु अर्थशास्त्रज्ञ, इतिहासज्ञ आणि या प्रश्नावर विचार करणारे इतर लोक यांनींहि या प्रश्नाचा विचार केला आहे. त्या विचाराच्या साह्यानें मानसशास्त्रज्ञ लोक आपला मार्ग आक्रमीत आहेत. न्यू यॉर्कच्या सिटी कॉलेज-मधील मानसशास्त्रशाखेचे अध्यक्ष मि. गार्डनर मर्फी यांनीं या विषयावर यू. एन्. च्या ' वर्ल्ड ' नियत-कालिकांत ( ऑगस्ट १९५१ ) आपले विचार दिग्दर्शित केले आहेत. ते मननीय वाटल्यावरून पुढें सारांशानें दिले आहेत. मि. मर्फी हे पूर्वी हिंदुस्थानांत येऊन गेलेले आहेत.

" प्रथमतः Prejudice ( पूर्वग्रह ) आणि Discrimination ( भेदभाव–उच्चनीचभाव ) यांमधील फरक लक्षांत घेतला पाहिजे. नीग्रोंबद्दलचे मानसिक पूर्वग्रह आणि त्यांच्या बाबतींत भेदभाव-बुद्धि ह्या दोन निराळ्या गोष्टी आहेत. आज अमेरिकेंतून तांत्रिक दृष्टीनें पाहतां हा भेदभाव कमी झालेला आढळतो. एखाद्या शहरांतील ' गोऱ्या विभागां'त हे ' काळे आदमी ' राहिले तर कुरकुर होईल; पण त्यांना विरोध होणार नाहीं. त्यांना जर स्वतःचें घर करावयाचें असेल तरीहि करतां येईल. अमेरिकेंतील संयुक्तसंस्थानांतील बहुतेक संस्थानांत नीग्रोंना सार्वजनिक बसेस, भुयारांतील आगगाड्या व मोठ्या आगगाड्यांतील ' पुलमन ' तर्फे होणाऱ्या सोयी यांचा लाभ घेतां येतो, पण म्हणून कांहीं त्यांच्याविषयींचे पूर्वग्रह गेले, असें नाहीं.

" पूर्वग्रह व उच्चनीचभाव यांमधील संबंध मात्र मोठा गंमतीचा आहे. या बाबतींत आपलें धोरण उलट दिशेचें होतें असें आज पुराव्यावरून वाटतें. आपण असें मानीत आलों कीं, प्रथम पूर्व-ग्रहांचें उच्चाटन करूं या व मग भेदभाव आपो-आपच कमी होतील. यामुळें आपणांला व्यर्थ कालक्षेप करावा लागला आहे. उलट, भेदभावाचा नायनाट करावयाचा प्रयत्न प्रथम करण्यानें आपलें कार्य अधिक साधेल. नीग्रो व गोरे लोक यांच्या संयुक्त वसाहतीची योजना या दृष्टीनें फार उपयोगाची ठरेल. या लोकांना प्रथम एकत्र राहूं द्यावें आणि त्यांच्या शहाणपणावर आणि माणुसकीवर बाकी सर्व सोंपवून द्यावें. यांतूनच समभावात्मक लोकशाहीचें तत्व रुजत असलेलें आढळून येईल. एक गोष्ट मात्र सुरुवातीलाच करणें कटाक्षानें टाळलें पाहिजे.










अनुक्रमणिका

याबाबतींत सार्वत्रिक मतनोंदणी करावयाचा प्रयत्न आरंभीच करतां कामा नये.

" एखाद्या व्यक्तीला दुसऱ्या व्यक्तीविरुद्ध कांहीं तरी उगीचच ( irrationally ) वाटत असतें, त्याला खरा 'पूर्वग्रह' म्हणावयाचें नाहीं—जरी prejudice हा शब्द आपण तेथें वापरीत असलों तरी ! खरी गोष्ट अशी आहे कीं, हे अस्पष्ट पूर्वग्रह सार्वत्रिक व मोठें रूप फार लवकर धारण करतात. ( Prejudice generalizes as fast as it is created like gas expanding at a terrific rate ). मुलाला किंवा वयांत आलेल्या माणसाला दुसऱ्या लोकांबद्दलचे अनुदार उद्गार ऐकायला मिळतात, किंवा एखाद्या चित्रपटांत किंवा विनोदी चित्रकथेंत एखाद्या व्यक्तीचें किंवा कुटुंबाचें बेढब चित्रण त्याला आढळतें. आणि विशेषतः तें वंश, धर्म किंवा संस्कृति यांवर आधारलेलें असतें. या सार्वत्रिक पूर्वग्रहाची कक्षा अजमावण्यासाठीं मी ( गार्डनर मर्फी ) आणि रेन्सिस लिकर्ट यांनीं एक गमतीची चांचणी घेतली. आम्हीं २१ देश व वंश मिळून एक यादी तयार केली. त्यांत डेन्मार्क, फिनलंड, ग्रीस, हंगेरी, पोलंड, तुर्कस्तान वगैरे देशांतील लोक होते. अमेरिकेंतील विद्यार्थ्यांना हे लोक आपल्यांत यावेत असें वाटतें कीं नाहीं तें पाहण्यासाठीं त्यांना यांतील १० देशांतील लोकांविषयीं विचारलें व त्यांबद्दलच्या होकारार्थी उत्तरांच्या प्रमाणांत उरलेल्या ११ देशांतील लोकांबद्दलच्या त्यांच्या प्रतिक्रियेची बरोबर अटकळ करतां आली. यावरून असें दिसतें कीं, पूर्वग्रह ही गोष्ट केवळ व्यक्तिगत परिचय-संबंधावर अवलंबून नसते. कित्येक वेळां अगदीं अपरिचित लोकांविषयींहि पूर्वग्रह तयार झालेले असतात. यूजेन हार्टलेनीं तर एक गंमतच केली. त्यांनीं अशीच एक चांचणी करतांना यादींत तीन काल्पनिक वंशांचे लोक सामील केले. डॅनिरिअन्स, पीरेनिअन्स आणि वॅलोनिअन्स या केव्हांहि अस्तित्वांत नसलेल्या लोकांनाहि, मुलांपैकीं होकार देणाऱ्या गटानें स्वीकारलें आणि नकार देणाऱ्या गटानें धिकारलें !

" पूर्वग्रहांमागील सत्य घटना समजून घेणें फार जरूरीचें आहे; कित्येक वेळां कांहीं प्रमाणांत त्या कळतातहि, पण त्या हेरणें फार कठिण काम आहे. मी हिंदुस्थानांत फिरलों त्या वेळीं मला आढळलें कीं हिंदी लोक ब्रिटिशांना अस्वच्छ समजतात आणि ब्रिटिश हिंदी लोकांना तसेंच मानतात. यावरून एकच गोष्ट दिसून आली कीं, कांहीं गटांत परस्परांविषयीं खरोखरीचे मतभेद आहेत व त्यांची योग्य समजूत करून घेतल्यास ते दूर करतां येतील.

" कॅलिफोर्निया विद्यापीठांत बर्कले मुक्कामीं कांहीं मानसशास्त्रज्ञांनीं तपासणी करतां असें आढळलें कीं, समाजांतील मध्यमवर्गांतील ज्या गटांचें समाजांत वर्चस्व असतें, परंतु ज्यांना नेहमीं आपली स्थिति अनिश्चित व असुरक्षित वाटत असते, असे लोक खालून वर येऊं पाहणाऱ्या लोकांबद्दल तिरस्कारच दाखवीत असतात. या बर्कले येथील मानसशास्त्रज्ञांनीं या तऱ्हेच्या वृत्तीला मानववंशशास्त्रज्ञांचीच संज्ञा " ethnocentrism "—'स्वजनकेंद्रित भाव'—अशी वापरली आहे. मानववंशशास्त्रांत याचा अर्थ असा आहे : आदिकालीन मानवगटांत अशी मनोभावना असे कीं, आपल्या स्वतःच्या चालीरीती तेवढ्याच सर्वसामान्य आणि बरोबर, आणि इतर लोकांच्या चालीरीती केवळ चमत्कारिकच नव्हेत तर अगदीं अनैतिक ! हाच तो मानवी 'स्वजनकेंद्रितभाव.' अत्यंत पूर्वग्रहदूषित झालेल्या मनांची ही अवस्था असते. ती दूर करावयास शिक्षणाचा मार्गच खरा मार्ग आहे. शिक्षण देतांना सरसकट जर्मन, पोर्तुगीज, जपानी अशा सामान्यवर्गवाचक संज्ञांचा व कल्पनाप्रतिमांचा उपयोग न करतां त्या त्या वर्गांतील व्यक्तीव्यक्तीमध्येंहि कसा फरक असतो, याबद्दल निश्चित प्रत्यक्ष माहिती वाचकांपुढें ठेवावयास पाहिजे. त्याशिवाय मुलांसाठीं अशा गोष्टी किंवा विनोदी चित्रकथा पाहिजेत कीं, ज्यांत केवळ अमुक वर्गावरच कटाक्ष न राहतां त्या त्या वर्गांतील निरनिराळ्या व्यक्तींतहि कोणकोणते भेद आढळतात तेंहि त्यांत यावयास पाहिजे

" सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे ज्याला 'action research' किंवा 'कृतींतून संशोधन' म्हणतात तिचा अवलंब करणें होय. दोन वर्गांच्या






संघटित क्रियेंतून मानवी मनांतील वैरभाव व मित्रभाव यांच्या ( dynamics ) गतिशास्त्राची माहिती होते. यांतूनच पुढच्या प्रगतीचें ज्ञान होतें. माणसाचें मन असेंच आहे, असें नुसतें म्हणून भागणार नाहीं. सर्वत्र जगभर असे क्रियाशील संघटित कार्यक्रम ( action programes ) म्हणजे प्रत्यक्ष कृतींतून ज्ञान होण्याचे कार्यक्रम चालू आहेत. मानसशास्त्रीय संशोधनानें हा मार्ग दाखविला आहे. त्याचा उपयोग करूनच खऱ्या समतानिष्ठ लोकशाहीकडे आपण जाणार आहोंत."

## सयामची सांस्कृतिक पार्श्वभूमि

'बृहत्तर भारत' म्हणून जो सांस्कृतिक भूखंड मानला जातो त्यांत सयाम, इन्डोचीन, इन्डोनेशिआ व त्याच्या आसपासचीं बेटें आणि मलाया यांचा समावेश होतो. बौद्ध धर्माच्या काळांत तर येथें भारतीयांचें प्राबल्य होतेंच, पण त्यापूर्वींच्या काळांतीहि तें असावें, असें म्हणावयास पुरावा उपलब्ध होत आहे. सयामचें नवें नांव 'थायलँड' असें आहे. त्या देशाच्या सांस्कृतिक पार्श्वभूमीची माहिती प्रो. रंजन यांनीं हिंदी 'जीवन-साहित्य' मासिकाच्या सप्टेंबरच्या अंकांत दिली आहे. तिच्यांतून पुढील भाग उद्धृत केला आहे :

" सयाममधील धर्म, कला, साहित्य, सामाजिक व्यवस्था आणि रीतिरिवाज हीं सर्व शेजारच्या राष्ट्रांशीं झालेल्या एकतेचीं व संयोगाचीं द्योतक आहेत. या ऐक्याच्या क्षेत्रांत चीन व भारत यांबरोबरच काम्बोडिया व ब्रह्मदेश यांचाहि मोठा भाग आहे. बाहेरून जरी सयाम बौद्धधर्मी असला तरी तेथें भारतीय संस्कृतीचें प्राधान्य आहे असें मानणें अगदीं चुकीचें होईल. वरील सर्व देशांतील संस्कृती सयाममध्यें येऊन आपल्यांतील भिन्नता सोडून नव्या एकरूपतेंत परिणत झाल्या आहेत. तात्त्विक दृष्टीनें सयामच्या संस्कृतीचें वर्णन मोजक्या शब्दांत असें करतां येईल : ती धर्माधिष्ठित संस्कृति आहे. कारण, सयामी कला, साहित्य व परंपरा या सर्वांची वाढ धर्माला केन्द्रस्थानीं स्थापूनच झाली आहे. गेल्या कांहीं वर्षांतच येथें पाश्चात्त्य संस्कृतीचा प्रभाव पडूं लागला आहे व येथील वरच्या वर्गांत संस्कृति धर्मनिरपेक्ष होत आहे; परंतु सर्वसाधारण आमजनतेंत मात्र अजून धर्म व संस्कृति एकच आहेत.

"पूर्वजपूजेप्रमाणें जीवकल्पनावादा(Animism)-वर सयामच्या जनतेचा विश्वास प्राचीन कालापासून आहे. 'थाई धर्मा'ची आरंभापासून ह्याच वादावर निष्ठा आढळेल. पुढें या देशांत बौद्ध धर्माचा प्रसार झाला व त्याचा राष्ट्रीय धर्म म्हणून स्वीकार करण्यांत आला. तसेंच, काम्बोडियाच्या प्रभावाखालीं येथल्या प्रजेनें कांहीं प्रमाणांत हिंदु धर्माचाहि समावेश आपल्या बौद्ध धर्मांतच करून टाकला. याच कारणामुळें प्रसिद्ध बौद्ध मंदिराच्या भिंतीवरहि रामायण व महाभारत यांच्याशीं संबद्ध अशा कथा लिहिलेल्या आढळतात. कोणत्याहि धर्माचा वा संस्कृतीचा स्वीकार येथें जसाच्या तसा न होतां त्यांत सयामी वातावरणाला अनुकूल असे फरक घडून येतात. म्हणूनच बौद्ध व हिंदु या दोन्ही धर्मांचें एकरूप अस्तित्व येथें असून, त्यांत प्राचीन देवतावादहि समाविष्ट झालेला आहे. मध्यसयाम विभागांत हिंदु संस्कृतीचा जोर अधिक भासतो, तर उत्तर आणि ईशान्य सयाममध्यें जुन्या देवताधर्माचा प्रभाव सर्वतोपरि आढळतो. विशेषतः ग्रामीण जनतेच्या राहणींत व रिवाजांत तो आढळतो. पण या दैवत धर्मांत बौद्ध धर्मानें कांहीं तरी नवीन शुद्धि केलेली आहेच. येथील बौद्ध धर्म हीनयान पंथाचा मुख्यतः असला, तरी काम्बोडिया व मलाया येथील श्रीविजय साम्राज्याच्या वेळीं महायान पंथाचा प्रभावहि बरेच दिवस होता. येथें ख्रिस्तधर्मी लोक कांहीं दिसले तरी त्यांचा प्रभाव पडलेला नाहीं; ख्रिस्ती धर्म येथें मूलभूत सयामी बौद्ध धर्माशीं मिसळून गेलेला आहे.

" सयामी कलेचें उद्दिष्ट नेहमीं धार्मिकच होतें. येथील मंदिरांचीं कोनाकार छतें आणि रंगीत चमकदार छप्पर व कौलार ह्या गोष्टी वास्तुकलेंत विशेष आहेत व त्यांचा संबंध चिनी घरबांधणीशीं फार आहे. सोन्याचा पत्रा मढवणें, सोन्याचें पाणी देऊन नक्षीकाम करणें वगैरे कलांत पौरस्त्य प्रभाव आढळून येतो. मूर्तिकलेचा संबंध बुद्धाच्या मूर्ती ओतण्याच्या कलेशीं आहे. चित्रकलेचा एकमात्र उद्देश म्हणजे मंदिरांतील भिंतींवर चित्रें रेखाटणें एवढाच होता.










त्यांतील रंगढंग, गर्दपणा व छाया हीं प्राचीनच होतीं. पण प्रकटीकरण (expression) आणि सुसंबद्धता यांबाबत पुढें पुष्कळ प्रगति झाली आणि बँकॉक कालांतील कांहीं चित्रें विशेषतः एमरल्ड-बुद्धमंदिरा-(Emerald Buddha Temple)मधील भित्तिचित्रें भाव, रंग व प्रकटीकरण या दृष्टीनें श्रेष्ठ समजलीं जातात. पण त्यांची तुलना अजन्ठ्यांतील चित्रांशीं मात्र होऊं शकत नाहीं. सयामी संगीताचें आरोह-अवरोह चिनी आहेत. त्यांत तीव्र कोमल स्वरांचा अभाव असतो. एकाच स्वरांत चीज म्हटली जात असल्याचा भास श्रोत्याला होतो. सयामी नाट्यकलेचा विकास फारसा झालेला नाहीं. नटनटींचें वृंदनाट्य व पदगति अतिशय सावकाशीची असते. त्यांत एक प्रकारचें सौंदर्य व कोमलता असते. भावप्रधान व्यक्तींना तें अस्वाभाविक वाटत नाहीं. या तऱ्हेच्या नाटकांना 'लाखॉन' (Lakhon) म्हणतात.

"चिनी व भारतीय संस्कृतींच्या परस्पर संघर्षांतून एक नवीन संस्कृति सयाममध्यें निर्माण झाली. 'अनामी' लोक मूळचे इन्डोनेशियन असले तरी ते चीनमध्यें जाऊन राहिले होते व त्यांनीं चिनी संस्कृति बरीचशी आत्मसात् केली होती. हे लोक जेव्हां परत हिन्दी-चीनच्या बाजूला वळले तेव्हां त्यांचा चम्पा येथील चाम लोकांशीं सामना झाला. सयामच्या पूर्वेला 'खमेर' नामक एक बलाढ्य हिंदुराज्य काम्बोडियांत चालूं होतें. व म्हणून चम्पाच्या पलीकडे चिनी संस्कृति फैलावूं शकली नाहीं. या तऱ्हेनें ही मधली संयुक्त सयामी संस्कृति निर्माण झाली.

"सयामचे लोक चिनी लोकांशीं मिळून मिसळून वागूं शकतात. भारतीयांशीं त्यांचें तसें जमत नाहीं. सयामच्या समृद्धीला चिनी लोकांची मोठी संख्या कारण झाली आहे व या मिळूनमिसळून राहण्यामुळें ती वाढतच आहे.

"मध्यसयामी लोकांचा रंग व शरीररचना उत्तर सयामी लोकांहून भिन्न आहे. उत्तरेकडील लोकांचा रंग अधिक गोरा व ठेवण अधिक उंच आहे, तर दक्षिणेकडील सयामी लोक अधिक लहान व गडद रंगाचे आहेत. या कारणामुळेंच संस्कृतीच्या मिश्रणाप्रमाणेंच शुद्ध थाई लोकांच्या रक्ताचें मिश्रण खमेर व मलायी लोकांशीं होऊन एक नवीन जातच निर्माण झाली. अशा तऱ्हेनें सयाम हें जगांतील दोन संस्कृतींचें मीलनस्थान आहे."

## कीटकांची विश्वामित्री सृष्टि

कीटकांच्या जीवनांत डोकावून पाहणें हें माणसाला नेहमींच मौजेचें व उद्बोधकहि असतें. मि. माल्कम् बर्र या लंडन येथील 'रॉयल एन्टॉमॉलॉजिकल सोसायटी'च्या माजी उपाध्यक्षांनीं 'दि इन्सेक्ट् लीजन्'मध्यें कीटकांची मनोरंजक माहिती दिली आहे. तिचा कांहीं भाग "Man's Rival: the insects" या नांवानें 'मिरर' (जुलै १९५१) मध्यें आला आहे. त्यांतून पुढील माहिती एकत्रित केली आहे :

"कीटकसृष्टींतील संचालकशक्ति म्हणजे 'जीवन', 'चेतना'-Life-होय. ६,००,००० (सहा लक्ष) कीटकांची प्रत्यक्ष माहिती शास्त्राला झाली आहे, आणि अस्तित्वांत असलेल्या एकंदर कीटकसृष्टीची प्रकारसंख्या दहा लक्षांहून कमी नसावी.'

"कीटकांचा जों जों अधिकाधिक अभ्यास करावा तों तों त्यांचें जीवन असंभाव्य वाटूं लागतें! आपला जवळजवळ विश्वासच बसत नाहीं एकेका गोष्टीवर! कांहीं जातींचे कीटक असे आहेत कीं, ते सर्वसाधारण विषासारख्या असलेल्या प्राणघातक पदार्थांवर अगदीं यथेच्छ ताव मारतात; ते अफू आणि 'स्ट्रिक्नाइन्'सारखे पदार्थ नुसते एकाद वेळच खात नाहींत, तर नेहमींचा खुराकच बनवितात आणि त्यावर उत्तम प्रकारें वाढतात.

"यांतील सर्वांत भयानक खादाड कीकट भुंग्याच्या वर्गांतील एक लहान जातीचा—Niptus hololeucus असला पाहिजे. एक कॅसीननें भरलेली बाटली बारा वर्षें बंद राहिली होती. त्यांत या जातीचे १५४७ हून अधिक किडे निघाले. यांपैकीं कित्येक किडे तर अविनाशीच भासतात! कारण कृमिशास्त्रज्ञ (entomologists) त्यांना मारण्यासाठीं जें सायनाइड विष वापरतात, त्या विषाच्या बाटलीच्या बुचांत कित्येक किडे आपले खुशाल मजेंत राहतात!

" आणि Ephydridae नामक एक माशीचेंहि कुटुंब आहे. सामान्यतः ही जात दलदलीच्या जागेंत आणि पाणथळ कुरणांत असते; पण यांतील कांहीं माशा बोरॅक्सच्या मिश्रणांत चांगल्या लठ्ठ होतांना आडळतात आणि अल्कलीयुक्त सरोवरांत आणि गरम झऱ्यांत मजेनें राहतांना आढळतात. याच कुटुंबापैकीं दुसरी जात Psilopa Petrolei यावर रसायनाचा परिणाम इतका कमी होतो कीं, त्या माशा देवदाराच्या तेलांत वाटेल तितका काळ राहूं शकतात आणि अशुद्ध पेट्रोलियम्‌मध्यें तर खूपच वाढतात.

" मेफ्लाय ( Mayfly ) नामक कीटकाला तोंड नसतें. प्रथमावस्थेंत तो कीटक पाण्याच्या खालीं मोठा शोषक प्राणी म्हणून ३–४ वर्षें राहतो आणि शेवटीं पुरी वाढ होऊन पाण्याबाहेर पडतो तो तोंडावांचूनचा कीटक म्हणून. त्याचें हें बाह्य जीवन फार थोड्या काळापुरतें टिकतें. पण तेवढ्यांत आंतड्यांचें रुपान्तर वारा भरणाऱ्या पिशव्यांत होऊन हा कीटक सूर्यप्रकाशांत नाच करूं लागतो आणि आपल्या प्रियकरिणीशीं प्रेमाचे काय थोडे क्षण अनुभवतां येतील तेवढे भोगून रतिसुख घेतो. पुढें खेळ खलास !—सिकेडस ( Cicadas ) नांवाचे प्राणी १७ वर्षें जमिनींत राहतात आणि मग एकदम एखाद्या भरगच्च झाडाएवढा मातीचा आकार भूपृष्ठावर उभा करून ते बाहेर पडतात आणि कांहीं थोडे दिवसच जवानी उपभोगून नामशेष होतात.

" कांहीं कीटकांतील मादीकडून नराचा नाश केला जातो. कांहीं कीटकांतील माद्या दर वर्षीं दशलक्ष अंडीं घालतात आणि असें अनेक वर्षें सतत चालतें. कांहीं कांहीं कीटकांत संभोग चालूं असतांच नराच्या शरीराचे तुकडे झाल्यावांचून गर्भाधानच होत नाहीं. म्हणून मादी त्याला संभोग चालूं असतांच कापून काढते !—उष्णतेवांचून उजेड ही किमया अजून माणसाला साधली नाहीं, पण कांहीं कीटक तो निर्माण करतात. 'कॅलिडिअम्' ( Callidium ) नामक मुंग्याच्या जातीचे कीटक अळीच्या अवस्थेंत (Larvae ) असतां साडेतीन मिलिमीटर जाडीचा शिशाचा पत्रा तोडून, देवदाराची फळी खाऊन मग आंतल्या केबलच्या तारांचें नुकसान करतांना आढळले आहेत. पिंवळ्या 'सॉ-फ्लाय' नामक कीटकाच्या अळ्या तर भयंकर लांकूडखाऊ असतात. पाईन लांकडाच्यावर शिशाच्या पत्र्याची तेरा वेष्टनें देऊन तें ठेवलें असतां त्यांनीं तेरा भोंकें पाडून शिसें सच्छिद्र केलें आणि आंतलें लांकूड खाल्लें !

" कित्येक कीटकांचें सामूहिक जीवन इतकें आखीव सांच्याचें असतें कीं, त्यापुढें कार्ल मार्क्सचा समाजहि जुनापुराणाच वाटावा ! त्यांच्यांत आनुवंशिक व्यवसाय असतात, आवडते पाळीव जंतु असतात, बागा असतात आणि एकंदर सामग्रीवर त्यांचा विलक्षण ताबा असतो. टर्माइट (Termite) नामक वाळवीची एक जात. मातीचे वीस फूट उंचीचे मनोरे तयार करते. हे कीटक निसर्गांतील जलतंत्रज्ञहि आहेत. ते फक्त वर वर जाणाऱ्या कमानीच उभारीत नाहींत तर ९० फूट खोलीवरचें पाणी मिळण्यासाठीं खोल खड्डेहि खणतात.

" कित्येक कीटक अगणित संख्येनें एकदम एकत्र जमतात. पांढऱ्या फुलपांखरांची अशी एक गोष्ट नमूद केलेली आहे कीं, तीं आकाशांत अनेक मैल लांब पसरली होतीं आणि बर्फाच्या ढगांसारखीं भासत होतीं. 'नन् मॉथ' नामक पतंगांची एक धाड जमली असतां तिला समुद्रावर उडवून लावण्यांत आलें; पुढें त्यांचीं मृत शरीरें किनाऱ्यावर वाहून आल्यावर तेथें अनेक मैल लांबीची सहा फूट रुंद आणि सहा फूट उंच अशी एक भिंतच तयार झाली. टोळांची धाडहि अशीच अगणित संख्येनें येत असते.

" या कीटकांचे आकार फारच चित्रविचित्र असतात. कित्येक कीटकांची शरीररचना (complex organisms) संमिश्र अवयवांची असते. पण त्यांचा आकार मात्र $\frac{१}{१००}$ (एकशतांश) इंचाएवढा सूक्ष्म असतो, स्टिक् नामक कीटक १० इंच लांबीचा असतो, तर alaptus नामक सूक्ष्म कृमीचा आकार याच्या एकसहस्रांश एवढ्या सूक्ष्म लांबीचा असतो. हें आकारांतील वैचित्र्य इतर जातीच्या प्राण्यांच्या मानानें फारच जास्त म्हणावें लागतें. "



अनुक्रमणिका






# दैवी संपत् चरित्र-माला

संपादक—श्री. दा. न. शिखरे, : श्री. आपटे गुरुजी

★

जगाच्या इतिहासांत दोन प्रवाह स्पष्टपणें दिसतात. एक स्वार्थी, भोगवादी व हिंसाप्रधान. इतरांना जिंकून, लुबाडून, गुलाम बनवून त्यांचेवर आपली सत्ता चालवावी, अशा महत्त्वाकांक्षेचे पराक्रमी व सामर्थ्यशाली पुरुष इतिहासांत आढळतात; किंबहुना त्यांनीं चालविलेल्या लढाया, त्यांनीं केलेल्या कत्तली, त्यांनीं घडविलेले रक्तपात यांनींच इतिहासाचीं वरीचशीं पानें रंगलेलीं असतात.

पण समाजाची जी धारणा होते व मानवजातीची जी प्रगति होते, ती दुसऱ्या कोटींतील थोर लोकांकडूनच. अभय, सत्य, दया, क्षमा, शान्ति, तेज इत्यादि दैवी संपत्तीच्या विभूतीच मानवांना प्रेमाचा व ऐक्याचा मार्ग दाखवितात. स्वतःला दिसलेलें सत्य स्थापण्यासाठीं व अन्यायाचें निर्दाळण करण्यासाठीं ते मूकपणें जनतेची सेवा करीत राहतात—अवश्य तर, त्या कामीं आत्म-बलिदानहि करतात. अशा पुरुषोत्तमांची ओळख प्रचलित इतिहासांतून फारच थोडी करून दिली जाते.

ती ओळख महाराष्ट्रीय वाचकांना यथाशक्य प्रमाणांत करून द्यावी, या हेतूनें "दैवी संपत् चरित्र-माला" काढलेली आहे. पृथ्वीच्या पाठीवरील सर्व देशांतील व सर्व धर्मांतील प्रेमपूर्ण व सेवाशील स्त्री-पुरुषांच्या जीवनांतील उदात्त कथा या 'मालें'त दिल्या जातील. साधारणपणें प्रत्येक पुस्तकांत अशा आठ अहिंसक संतांचीं चरित्रें असतील व अशीं एकूण बारा पुस्तकें निघतील.

कवि श्री. बा. भ. बोरकर, 'आनंद' कर्ते श्री. गोपीनाथ तळवलकर, श्री. दे. ना. टिळक, श्री. काकासाहेब बर्वे इत्यादि लेखन-साहाय्य करणार आहेत. पहिलें पुस्तक लवकरच प्रसिद्ध होईल. प्रत्येक पुस्तक सुमारें शंभर पृष्ठांचें असेल व त्याची किंमत एक रुपया राहील.

★


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष